नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




## श्रे य ना मा व लि–

- **तीन भिन्न प्राकृतिक कथा** – मरणाचे स्वागत करायला लावणारा....पशु–प्रा. वसंत अ. कुंभोजकर • वरचा चोर नि नसता घोर....करायला गेलो एक– पंढरीनाथ रेगे • हात, पाय, केस कापायला लावणाऱ्या.... चिंध्या– प्रा. सदानंद रेगे.
- **आम्ही असे लिहितो** – कविवर्य बा. भ. बोरकर यांची प्रभाकर अत्रे यांनी घेतलेली खास मुलाखत.
- **खास लेख** – कै. शास्त्रीजींच्या पुण्यतिथी निमित्ताने त्यांच्या संस्मरणीय आठवणी–शास्त्री कथा–प्रभाकर चेंद्वणकर • बालकवि आणि रमाई–बालकवींची अंतरीची व्यथा कथन करणारे एक मार्मिक विवेचन– प्रा. म. बा. धोंड • पद्मश्री विजय हजारे—येत्या जानेवारीत वेस्ट इंडीजबरोबर खेळल्या जाणाऱ्या 'हजारे बेनिफिट' सामन्याच्या निमित्ताने खास लेख–वसंत नाईक • दिवाळी अंकातील कथा–अलिकडे खटकणाऱ्या कथांबद्दल आपले प्रांजल मत मांडणारा प्रा. व. दि. फडके यांचा टीकात्मक लेख • चित्रकला... नवी व जुनी–चित्रकार व्ही. एस्. गुर्जर.

☆ शिवाय ☆

असे पाहिले, असे ऐकले, सन्मानपुष्पे, दीपमाला, ऐसी अक्षरे रसिके, क्रिकेटमधील गंमती-जंमती, आणि 'आगामी सार्वजनिक' निवडणूक व्यंगचित्रे आणि

' हे उभे आहेत " ह्या दिवाळी अंकातील स्पर्धेचा स्फोटक निकाल.

**दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

• संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकास रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay –4

अनुक्रमणिका

दीपावली

**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्ति फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# सवाल--जबाब....

एक जानेवारी १९६६ ते एकतीस जानेवारी १९६६ ची कॅलेण्डरची पाने फडफडली, उडाली आणि आता काळाच्या उदरात गडपही झाली. क्षणाक्षणाने झरतो काळ, करून देत जागा नव्या क्षणांना. त्या क्षणांच्या पंखावर असतात सुंदर, चित्तवेधक आकृति–कलाकृति! ते क्षण बोलावीत असतात प्रेमाने. देत असतात दिलासा नव्या सुखांचा. पेरीत असतात नव्या आकांक्षा. खतपाणी घालीत असतात नव्या आशांना. देत असतात एक परमसुखाचा मूलमंत्र "काल ही काल होती–ती विसरून जा. उद्याचे स्वप्न सुंदरतर व्हायचे असेल तर आजचा दिवस 'सुंदर' घालविण्यासाठी चांगले वागा" त्या क्षणांचे फूलपाखरू नाचत असते डोळ्यासमोर. त्याचे गाणे कानात गुणगुणत असते एक नवे आशा गीत आणि त्याने फुलांतून वेचून आणलेला मधु मकरंद आणीत असतो मनाला धुंदी. त्या धुंदीतच दिसतात स्वप्ने–नव्या आशादायी संवत्सराची! त्या स्वप्नांवरच जगतो आजचा खचलेला, पिचलेला, खंतींनी भरलेला, अपूर्ण मानव! राखेतून उठतात नवे युगंधर, घडतात नवे इतिहास, प्रगटते नवे संशोधन. कला साकारतात. पृथ्वीवरचा महामानव झेपावतो चंद्र-सूर्याच्या दिशेने–कांक्षा बाळगीत तेथली रत्ने ह्या गरिब धरेवर उधळून देण्याची!

अखेर प्रत्येक येणारे संवत्सर ही अशीच आशागीते गात येत असते. त्या संवत्सरांचे आपण स्वागत करीत असतो. त्या गीतांचा अर्थ लावीत, तो जीवनात उतरवीत आपण ते वर्ष घालवतो. अजूनही हा प्रवास चालू आहे. चालू राहणार आहे. ती स्वप्ने, ती गीते, त्या क्षण-पंखावरच्या सुंदर आकृति हे आपले खरे जीवनसाथी. त्यांच्या प्रेरणातून जीवन 'सजीव' होते. मग लाभते यश! जीवन सजीवच झाले नाही तर मग उरते काय? शून्य! मोठ्ठे शून्य!! पण गणितात शून्याला किंमत असली तरी जीवनात मात्र त्याला अक्षरशः शून्य किंमत आहे.

गेले वर्ष हे आपल्या दृष्टीने कसोटीचे वर्ष होते. पहिल्या दहा दिवसात आम्ही गमावला तेजस्वी पंतप्रधान! त्यानंतरच्या काळात सतत संघर्ष चालूच आहे. काश्मीर-पासून कन्याकुमारीपर्यंत व द्वारकेपासून आसामपर्यंत सर्वत्र परिस्थिति ह्या ना त्या कारणाने स्फोटकच बनत चालली आहे. मूल्ये उरली नाहीत. शिक्षणादि क्षेत्रात जरब उरली नाही. पावित्र्य संपले. हिंसा, अत्याचार, उपोषणे, गोळीबार, सत्याग्रह इत्यादींनी गेल्या वर्षी अगदी धमाल केली. निधर्मी राज्यात 'धर्म' उरला नाही. 'नीति' नीतिभ्रष्ट झाली. लोकशाही काहीशा संभ्रमात सापडलेली आहे. गोवाप्रश्न, सीमाप्रश्न, पंजाबचा प्रश्न, आसाम, नागांचे प्रश्न ह्या साऱ्यांनी उग्र स्वरूप धारण केलेले दिसते आहे. बिहारचा दुष्काळ, कोकणातले वादळ वगैरे समस्या आहेतच. अमेरिकन अन्न मदतीने हात आंखडला आहे. 'गोहत्या' प्रकरणानेही आता निर्णायक स्वरूप घेतले आहे. विद्यार्थी हा नव्या क्रांतीचा अग्रदूत ठरू पहात आहे. सर्व अर्थांनी गले वर्ष 'कसोटी'चे वर्ष होते. तो 'वारसा' घेऊनच आपणास नव्या वर्षात पदार्पण करावयाचे आहे. कसोटी ही नेहमीच पुरुषार्थाला आवाहन करीत असते. आव्हाने देऊन तो सतत पेटता ठेवीत असते. गेल्या वीस वर्षातच नव्हे तर गेल्या कित्येक शतकात अशीच आव्हाने आम्हाला मिळत आली आहेत. ती स्वीकारीत, त्यावर मात करीत करीत आजचा भारत उभा आहे. भारताचा आत्मा अभंग राहिला तर येणारी आव्हानेही तो पचवील व नवी सुवर्णपाने लिहिली जातील–पुरुषार्थाने! राष्ट्रांची आयुष्ये शतकानी मोजली जातात. मूल्य केले जाते ते त्या राष्ट्राच्या आत्म्याच्या अभंगतेवरून! आपण आपला आत्मा अबाधित राखला पाहिजे. तो राखला तर सर्व आघाड्यांवरची आव्हाने आपण पचवू शकू! नवे वर्ष ही कसोटी पाहण्याच्या कांक्षेनेच अवतरले आहे. त्याच्या पानावर आम्ही अखेर काय रेखाटणार आहोत? पराक्रम की कायरता? ऐक्य की विघटना? राष्ट्रभावना की प्रांतवाद? संकुचित जातिनिष्ठा की व्यापक देशभक्ति? स्वतंत्र व्यक्तित्व की परकी सोंगे? ह्या साऱ्या प्रश्नांची मालिका हाती घेऊन नवे संवत्सर समोर उभे राहिले आहे. काय उत्तरे देणार आहोत आपण? आमच्या उत्तरासाठी पुढली सारी पाने-खोळंबून राहिली आहेत. काळ पुढे धावतो आहे, धावणार आहे. ह्या सूर्याच्या अश्वावर स्वार होऊ या–नवी सुवर्णपाने लिहिण्यासाठी. नवा इतिहास घडविण्यासाठी!!

–संपादक




## अकृत्रिम आनंद !

सादर प्रणाम,

'दीपावली'चा दिवाळी अंक पाहिला. दरवर्षीप्रमाणेच परंतु किंबहुना त्याहूनही अधिक सुंदर निघालेला हा अंक पाहून अपेक्षापूर्तीचा अकृत्रिम आनंद वाटला.

तुमच्या कुंचल्याची मनस्वी अशी रंग-किमया सुद्धा अंतरातील सौंदर्यभावनेला सुखद स्पर्श करून राहिली आहे. खरोखर माझ्या पिढीचे गेल्या वीस पंचवीस वर्षातले भावजीवन आपल्या रंगाच्या व आकृतींच्या जादूगार स्पर्शाने रंगले आहे व त्यातील कोणत्यातरी चिरजीवन व चिरनूतन द्रव्याने आमचे जीवन चिर-तरुण झाले आहे असे मला नेहमी वाटते.

यंदाची दिवाळी तुम्हाला बहुसुखाची जावो.

आपला नम्र,

**पार्ले** **प्रभाकर नेरुरकर**

## निर्भेळ आनंद !

स. न. वि. वि.

सर्व अंक वाचल्यावर सुवास हीच कथा मला सर्वाधिक आवडली. स्पर्श आणि क्षणजीवी या कथा त्यानंतर आवडल्या.

हास्य-पर्मिट आणि वासांसि जीर्णानि याचे मनात मोठे युद्ध चालू होते. पण शेवटी लूपचे वजन पडताच जीर्ण वस्त्राचे पारडे खाली गेले.

अनेक लेखकांच्या लेखनातून अधिक-कमी रोचकता जाणवणे सोपे असते. पण तुमच्याच चित्रांतून हे अधिक रम्य हा निर्णय घ्यायचा तरी कसा? हे चित्र अधिक चांगले असे म्हणावे तर तो निर्णय घेऊन होण्याच्या आतच मन द्विधा होते.

माझा स्वतःचा लेख सलग छापला गेला त्यामुळे मोठे समाधान वाटले. श्री. अरविंद ताटके यांची कथा अर्धीच असल्याने त्याना निवडणुकीत अन्याय घडेल असे वाटते. श्री. प्र. श्री. नेरुरकर यांच्या कथेत इतक्या इंग्रजीची आवश्यकता होतीच असे वाटत नाही. हे इंग्रजी नसते तर रसाचा प्रवाह अकुंठित रहाता. सदानंद रेगे यांची परदेशात घडणारी कथा जर मराठीत घडू शकते तर नेरुरकर यांची कथा तशीच घडावयास अडचण नसावी.

**सहार** आपला स्नेहांकित,

**मुंबई-२९** **आनंद साधले**

## अत्यानंद !

स. न. वि. वि.

गेले ४।५ वर्षे मी आपल्या मासिकाचा नियमित वर्गणीदार व वाचक आहे. यावेळचा "दिवाळी अंक" फारच सुरेख होता यात शंका नाही. सर्वच कथा व इतर साहित्य विशेष वाचनीय आहे. आपण "निवडणूक स्पर्धा" ठेवली आहे. हा स्तुत्यक्रम अभिनंदनीय आहे. त्या दृष्टीने मी "कूपन" भरून पाठविले आहे. सर्वच साहित्य वाचनीय व तडफदार आहे. कोणती कथा चांगली म्हणून निवडावयाची हाच प्रश्न मला सतावे, परंतु बराचसा प्रयत्न करून व अंक पुन्हा पुन्हा वाचून "कूपन" भरले आहे. पाहू या माझा अंदाज कितपत खरा ठरतो तो?

'दीपावली'स सुयश लाभो हिच इच्छा! कळावे.

आपला विश्वासू,

**पुणे, १.** **डी. ए. वाटारकर.**

## खरा आनंद !

स. न. वि. वि.

आपला दीपावलीचा दिवाळी अंक मला फारच आवडला. खरं म्हटलं तर आम्ही म्हणजे शिपाई गडी तेव्हा आम्हाला वाङ्मयातले काय कळणार? तरीही नेहमीच महाराष्ट्राबाहेर रहावे लागत असल्यामुळे जेव्हा जेव्हा मराठी मासिक दृष्टीस पडते आधाशासारखे त्यावर मी तुटून पडतो. झांशीच्या बुक-स्टॉलवर दीपावलीचा अंक दिसला आणि ताबडतोब खरीदला. व बीन्याला बंगल्यावर पोहोचल्यावर एका दमात वाचून काढला. सबंध अंक अतिशय सुंदर व अभिरुचिसंपन्न आहे. आपल्या निवडीबद्दल अभिनंदन ! प्रथम माझा मतदानात भाग घ्यायचा विचार नव्हता. म्हटलं आपल्याला काय कळतंय्? दुसरं म्हणजे सर्वच साहित्य इतके छान आहे की कोणते उत्तम हे निवडायचा प्रश्न पडला. तरीही माझ्या अल्पबुद्धीप्रमाणे मी माझी निवड पाठवत आहे. बक्षीस मिळविण्याची मुळीसुद्धा इच्छा नाही व आशाही नाही परंतु केवळ कुतुहल म्हणून मी भाग घेत आहे. माझ्या निवडीपैकी एकादी निवड जरी बरोबर ठरली तरी मी आपणास धन्य समजेन.

निवडीचा निकाल आपण मला पत्राद्वारे कळविला तर मोठी कृपा होईल. आपण म्हणाला आम्ही दीपावलीच्या अंकात प्रसिद्ध करू. परंतु मी हल्ली सरहद्दीवर असल्यामुळे आपला अंक मला मिळण्याचे सौभाग्य लाभणार नाही.

69 Field Regiment
99 APO

आपला विश्वासू,

**व. ग. मोहिते**



११ जानेवारी १९६७ रोजी भारताचे लाडके लालबहादूर शास्त्री यांची प्रथम पुण्यतिथी आहे. **कै. शास्त्रीजींच्या पुण्यतिथींच्या निमित्ताने त्यांच्या संस्मरणीय आठवणी** देऊन पुण्य-स्मरणार्थ अभिवादन करीत आहोत.

# शास्त्री कथा

—प्रभाकर चेंदवणकर

**सन** १९३१ साली भारतातील किसानांच्या **परिस्थितीचे अध्ययन** करण्यासाठी अखिल भारतीय कॉंग्रेसने एक 'एग्रिअन कमेटी' नेमली. या कमेटीत पंडित जवाहरलाल, रफि अहमद किदवाई, बाबू पुरुषोत्तमदास टंडन, पंडित गोविंद वल्लभ पंत, व्यंकटेश नारायण तिवारी व लालबहादूर शास्त्री होते. या कमेटीवर असताना लालबहादूर शास्त्रीजींनी कार्यवाह नेमणे, आवश्यक आकडेवारी गोळा करणे, व कमेटीचा एकंदर अहवाल तयार करण्यासबंधी बरीच मेहनत घेतली. या कामासाठी लालबहादूरजी दिवसा सोळा ते अठरा तास राबले. परिश्रम घेतले. हिंदी व उर्दूवर त्यांचा सारखाच अधिकार होता. तसेच कार्यवाहींच्या वहीत बारीक सारिक गोष्टीची ते कटाक्षाने नोंद करीत. त्यांची कार्यपद्धति वाखाणण्यासारखी होती. तसाच त्यांच्या कार्याचा—कामाचा उरकहि दांडगा होता. मंत्री नसतानाहि त्यांची कार्यतत्परता पाहून तर साऱ्यानीच अचंबा व्यक्त केला. या कमेटीवर असताना शास्त्रीजींच्याा सद्‌गुण-समुच्चयाची कसो-टीच लागली.

दुसरी गोष्ट अशी कीं, केवळ शास्त्रीजी या कमेटीवर होते म्हणूनच 'एग्रिअन कमे-

## सत्याची किंमत

टीचा' संपूर्ण अहवाल सुरक्षितपणे बाहेर पडला. यशस्वीरित्या प्रकाशित झाला असेच म्हणावे लागेल. याचे कारण असे कीं या कमेटीवर असलेले पंडित नेहरू व बाबू पुरूषोत्तमदास टंडन यांच्यात कधीच सूत जमत नसे. एकमत होत नसे. यामुळे हरघडी वाद माजत असे. अशावेळी शास्त्रीजी त्या दोघाना सांधणारा सेतू बनत. व त्यांच्यात मतैक्य घडवून आण-ण्याची महान कामगिरी पार पाडीत. आणि ही महान कामगिरी बजाविण्यासाठी शास्त्रीजींना आनंदभवन ते टंडनजींचे घर या दरम्यान सारखी पायपीट करावी लागे. सारखे खेटे घालावे लागत. परंतु म्हणून काही शास्त्रीजी कधी त्रासले नाहीत किमान त्याना कधी कमीपणा देखील वाटला नाही. भारतीय किसानांच्या परिस्थितीचे खरेखुरे सत्यस्वरुप उजेडात यावे, या सद्‌हेतूने प्रेरित होऊनच एग्रिअन कमेटीच्या यशस्वितेसाठीच शास्त्रीजींची सारी खटपट चालली होती. शास्त्रीजींनी आपले प्रयत्न जारीने चालू ठेविले होते. व मुख्य म्हणजे या कमेटीचा अहवाल सर्वसमंत होऊन एकमताने पार पडावा यासाठीच शास्त्रीजींची सारी धड-पड होती. शास्त्रीजी आपल्या प्रयत्नांची पराकाष्टा करीत होते. यासाठी लाग-णारा सर्वांचा एकोपा शास्त्रीजींनी व्यव-हार चातुर्यात युक्तिवादात, आपल्या प्रभावी परंतु मधुरवाणीत, मनमिळावू-पणाने, चिकाटीने तथा कार्यतत्परतेने साधला होता. मिळविला होता.

एक मात्र खरं कीं या 'एग्रिअन कमे-टीच्या' रूपाने शास्त्रीजींच्या अंगच्या सद्‌गुण समुच्चयाचा साऱ्यानाच परिचय घडून आला. विशेषतः शास्त्रीजींच्या

या सद्‌गुण समुच्चयाचा पंडितजी, टंडनजी तथा पंतजी यांच्यावर फार मोठा प्रभाव पडला. किमान शास्त्रीजींच्या सद्‌गुण समुच्चमानी या सर्वानाच त्यांच्याकडे आकर्षित करून घेतले. आणि परिणामतः या साऱ्यांच्याच ठिकाणी शास्त्रीजींच्या प्रति अपार स्नेहभाव, गाढ विश्वास–आदरभाव निर्माण झाला. अगदी अल्पावधीतच शास्त्रीजीनी या तीन महापुरुषांच्या हृदयात आदराचे तथा मानाचे स्थान मिळविलं.

शास्त्रीजी म्हणतात, "एग्रिअन कमेटीवर मी काय केल्याने माझ्या मनात एक अशा तऱ्हेचा वृढ विश्वास निर्माण झाला, माझ्या मनात अशी एक आत्मविश्वासाची मनोधारणा निर्माण झाली कीं, अगदी परस्परविरोधी मतप्रवाहाना एकरूप करणारा–एकत्व सांधणारा मिलन बिंदू असू शकतो. तसेच परस्परविरोधी विचारांचा समन्वय साधणारे सूत्र प्रयत्नांति निघू शकते. हे सारे माझ्या अनुभवान्ति प्रत्ययास आले. आणि माझ्या जीवनातल्या तथा राजकारणातल्या अनेक समस्यांची गुंतवणूक सोडविण्यास मला याचा हरघडी उपयोग पडला."

आणि भारताच्या जीवनातली फार मोठी बिकट समस्या–किमान त्याच्या जीवनातली अखेरची–म्हणजे भारत व पाकिस्तान संघर्षाचे वाढते स्वरुप पाहून अखेर पाकिस्तानबरोबर लढाई करण्याचा त्यानी घेतलेला झटपट निर्णय, तदनंतर उद्‌भवलेली एकंदर परिस्थिती हाताळण्याचे त्यानी दाखविलेले निश्चयपूर्वक निर्णायक चातुर्य-कौशल्य व अखेर अगदी शेवटच्या टोकाप्रत भिडलेल्या परिस्थितीत, अगदी परस्परविरोधी भूमिकावस्थेत, अगदी परस्पर विरोधी मतप्रवाहाच्या भोवऱ्यात स्वतः उडी टाकून ते परस्पर विरोधी मतप्रवाहाना एकत्व सांधण्याचा त्यानी प्रयत्न केला. आणि हे एकत्व सांधण्यासाठी, परस्परविरोधी मताचे–विचारांचे समन्वय साधण्यासाठीच, भारत व पाकिस्तान या दोन राष्ट्रात समझोता घडवून आणण्यासाठीच अखेर ताश्कंदला जाण्याचा निर्णय घेतला. ही प्रेरणा त्याना १९३१ साली एग्रिअन कमेटीवर काम करीत असताना अनुभवान्ति प्रत्ययास आली होती. मिळाली होती. याचे खोलवर बीज त्यांच्या हृदयात तेव्हापासूनच रुजले होते. आणि त्याना स्वतःला अनुभवान्ति आलेली ही सद्‌भावनेची सत्प्रवृत्तीची प्रेरणा त्यानी आपल्या हृदयाशी जतन करून ठेविली होती. याच सद्‌भावनेच्या प्रेरणेनुसार त्यानी आपल्या जीवनातील तथा राजकीय समस्यांची गुंतवणूक सोडविली होती. परंतु त्यांच्या हृदयात सतत वास करणाऱ्या या सत्प्रवृत्ती सद्‌भावनेचे जगाला प्रत्यंतर घडवून आणण्यासाठी ताश्कंद येथे जाऊन आपल्या अमोलिक प्राणांच्या बलिदानाची आहुती देऊनच जगाच्या प्रत्ययास आणून द्यावे लागले. आपल्या प्राणांचे मोल देऊनच त्याची सत्यता साऱ्या जगास पटवून द्यावी लागली.

* *

## भारताचे डॉ. डोलफस

पंडित जवाहरलाल नेहरू विश्वविख्यात साहित्यिक रोमां रोलांच्या निमंत्रणावरून विश्वशांती परिषदेला हजर रहाण्यासाठी पॅरिसला गेले होते. हजर राहिले होते. व परतताना ते झेकोस्लोव्हॉकिया, स्पेन, मिसर आदि देशाना भेटी देऊन परत भारतात आले. वाटेत ते झेकोस्लोव्हॉकियामध्ये गेले असताना झे. कोचे गृह तथा विदेशमंत्री डॉ. डोलफसची त्यांची भेट झाली. केवळ ४ फूट ११ इंच उंचीचे दुबले पतले डॉ. डोलफसची असामान्य बुद्धिमत्ता, संघटनशक्ति, तथा चारित्र्यनिष्ठा पाहून पंडितजींच्या मनावर फार मोठा परिणाम केला. डॉ. डोलफसच्या छोटयाशा मूर्तीने पंडितजींवर फार मोठा प्रभाव पडला.

पंडितजी भारतात आल्यानंतर रफिअहमंद पंतजी, आचार्य नरेन्द्र देव सारेजण पंडितजीना भेटण्यासाठी अलाहाबादला आले होते. पंडितजींच्या आनंदभवनात या नेत्याबरोबरच काही स्थानिक कॉंग्रेस कार्यकर्तेहि पंडितजीना भेटण्यासाठी आले होते. त्यांच्याबरोबर काही औपचारिक चर्चा करीत असतानाच लालबहादूरजी त्याठिकाणी आले. हजर झाले. त्याना पहाताच पंडितजी काहीशा गमतीने म्हणाले, "या डॉ. डोलफस......!"

पंडितजीनी त्याना या नावाने पुकारताच लालबहादूरजीना थोडेसे आश्चर्य वाटले. पंडितजीनी केलेली त्यांची थट्टा काही त्यांच्या लक्षात आली नाही. थट्टेचा अर्थ त्याना काही उमजेना. शास्त्रीजीना अधिक गोंधळात न टाकता पंडितजीनी साऱ्याना डॉ. डोलफसची हकिगत निवेदन केली. व मुक्तकंठाने त्यांची स्तुति केली. ते ऐकून शास्त्रीजींच्या ओठांवर मिस्किल हास्य चमकले. हे पाहून पंडितजी शास्त्रीजींच्याकडे पहात पुनःच म्हणाले, फक्त रंग व रूप सोडल्यास शास्त्रीजी तुमच्यात व डॉ. डोलफसमध्ये बरेच साम्य आहे.

यावर रफि अहमंद किदवाई हळूच गंमतीने म्हणाले, "जवाहरलालजी, स्वतंत्र भारताचे आपण पंतप्रधान बनल्यावर तुम्हाला गृह व विदेशमंत्री शोधावा लागणार नाही!" आतापासूनच शास्त्रीजींच्या नावाची नोंद करून ठेवावयास हरकत नाही.

पंडितजी लागलीच हसून म्हणाले, "प्रथम तुमचा व पंतच्यानंतरच——!"

पंडितजींच्या प्रशंसेने लाजून काहीशा संकोचाने शास्त्रीजी म्हणाले——"छे–छे———!"

आणि काय आश्चर्य. . . . ! नेहरूनी वर्तविलेले भविष्य तंतोतंत खरं झालं. खरं ठरलं. . . . . . . . !! ●●●

**अवर्षणाच्या आपत्तीतील**
**आपल्या देशबांधवाना**
**सहाय्य करा**

**आपल्या देणग्या खालील पत्त्यावर पाठवा**

**पंतप्रधानांचा अवर्षण निवारण निधी,**
**कॅबिनेट सेक्रेटरिएट, राष्ट्रपती भवन**
**नवी दिल्ली ४.**

# पशु

—प्रा. वसंत अ. कुंभोजकर



**सरलाबाई** आता अगदी दिवसात होत्या. त्यांच्या हिशोबानं त्याना नऊ महिने भरले होते. तरीहि त्यानी पिंपळाच्या प्रदक्षिणा थांबविल्या नव्हत्या. घाण्याभोवती फिरणाऱ्या जखमी बैलाप्रमाणं, त्या पिंपळाभोवती निर्जीवपण फिरत राहायच्या. अगदीच पाय उचलेना झाला, की मग थोडा वेळ खाली बसायच्या. मग फिरून खालच्या पारावर हाताचा रेटचा देऊन आपला डेंगाळलेला देह उभा करायच्या आणि एकशे आठ प्रदक्षिणा पुऱ्या करून मगच घरी यायच्या.

पण पिंपळाच्या प्रदक्षिणा हे काही त्यांचं एकच व्रत नव्हतं. कुणीसं त्याना सांगितलं, की अमकी तमकीनं व्यंकटेश—स्तोत्राचं तीन महिन्याचं पठण केलं आणि तिला मुलगा झाला. तसं व्यंकटेश स्तोत्र त्या रोजच म्हणत. पण आता उपासना म्हणून तीन महिन्याचं पठणहि त्यानी नुकतंच संपविलं होतं. या उग्र अनुष्ठानासाठी त्या ऐन मध्यरात्री उठून थंडगार पाण्यानं स्नान करायच्या. माजघरात झोपलेल्या पांचहि मुलींची अंथरुणं ओलांडून देवघरात यायच्या. देवापुढं समई लावायच्या. बऱ्याच वेळा समईत घालायला तेल शिल्लक नसायचं. अशावेळी नुसत्या फुलवातीवर भागवायच्या. निरंजनात घालायला तूप तर गेल्या सात आठ वर्षात मिळालं नव्हतं. आता कधी कधी डबा निपटून नखभर डाल्डाहि निघायचा नाही. मग नुसतीच उदबत्तीची काडी पेटवून ती, त्या सोंगटीत खोचायच्या. अंधारातच देवापुढं बसायच्या. अगदी स्तोत्रात सांगितल्याप्रमाणं 'एकाग्र चित्ते एकान्ती आणि बैसोनिया स्वस्थचित्ती' व्यंकटेश स्तोत्राचं मनातल्या मनात पारायण करायच्या. तो उदबत्तीचा टिपका काही वेळ झगझगायचा. पण स्तोत्र पुरं व्हायच्या आधीच बहुधा तो विझून जायचा. मग सगळाच अंधार व्हायचा. अंधार. बाहेरच्या खोलीतून दामुआण्णांच्या घोरण्याचा केवढा तरी आवाज येत असायचा. माजघरात झोपलेल्या पांचहि पोरींचे श्वासोच्छ्वास संथपणे अंधारात घुमत असायचे. पांच तऱ्हेच्या पाच पोरी. पण त्या साऱ्यांचे आपण सारखेच अपराधी आहोत, असा विचार सरलाबाईंच्या मनात यायचा. त्या अंधारातहि त्याना तोंड लपवावंसं वाटायचं.

स्वयंपाकघराच्या चौकटीला वाळवीचा किडा पोखरत असायचा त्याचा कर्रर्र असा विचित्र कर्णकटु आवाज सरलाबाईंच्या काळजाला पोखरत राहायचा. ऐन मध्यरात्रीच्या भयाण शांत-

**चांदीची समई विकून झाल्यावर, घरातील मोठमोठी भांडी विकूनच रेशनिंगचे धान्य आणावे लागते याची तर लाज वाटत नाहीच–परंतु आण्णाना पोरगी आईच्या बरोबरीची झाली तरी घरात दरवर्षी पाळणा हालतोच आहे याची तरी लाज वाटावी. त्या मुली आता काय म्हणतील – याचा विचार न करताच सरला-बाईंना रात्री दहा न वाजले तोच हाक मारणं होत असे....**

---

तेला कुणी तरी रक्त येईपर्यंत ओरखडे काढीत आहे. आणि आपल्या भोवतालीच अंधार असहायपणे कण्हतो आहे असा त्याना भास व्हायचा. नवऱ्याच्या तालबद्ध आणि निश्चित घोरण्यानं सरलाबाईचं स्तोत्र म्हणत असलेलं 'स्वस्यचित्त' अस्वस्थ व्हायचं. त्याना चीड यायची. वयात आलेल्या अरुणेच्या विचारानं त्यांच्या पोटात पीळ पडायचा. काळजात कालवाकालव व्हायची. पोरगी मॅट्रिक झाली. सतरावं सरून अठरावं लागलं. पण अजून तिला घरात परकर पोलक्यात हिंडावं लागतंय्. पोलक्यात छाती दडून राहायचं काय वय आहे तिचं ? कार्टीला आणि देवानं रूप तरी कशाला दिलं इतकं. खरं म्हणजे लग्नाला आलेल्या या पोरीला घरात नेसायला सुद्धा पातळं घ्यायला हवीत. पण अवघं एक पातळ आहे. तेहि मामानं घेऊन दिलेलं. ते पातळ तरी किती दिवस टिकावं ? अकरावीचं सबंध वर्ष या एका पातळावर काढलन् पोरीनं. रोज तेच नेसते धुवून. आणि बाहेरून येताच सोडून घडी करून ठेवते. कुणी वाहेरचा माणूस घरात आला तर किती चमत्कारिक दिसत असेल. पण या गोष्टीची काही खंत आहे का इकडं ? अशी गाढ झोप लागते तरी कशी म्हणते ! मेली उद्या घराला आग लागली तरी यांचं घोरणं संपायचं नाही. आणि आता आग लागायची तरी कुठं बाकी राहिलीय्?

बाहेरच्या खोलीत दामुआण्णा आता कूस बदलून दुसऱ्या पट्टीत घोरत असत. वाळवीचा किडा करकरतच असे. आणि सरलाबाईना आपलं स्तोत्र कुठवर आलं ते आठवेनासं होई. मग त्या अंदाजानं धागा जुळवून घेत. काही ओव्या म्हणत आणि 'विषयासक्त मंदमती आळशी!' इथवर आल्यावर नकळत फिरून त्यांच्या मनात नवऱ्याचाच विचार मनात येई. याना म्हणे मुलगा पाहिजे. कशाला पाहिजे मुलगा? अशी काय इनामदारी उतू चाललीय्? हत्तीच्या पावलासारख्या दांडग्या दांडग्या जमिनी विकल्या. आणि उरल्या सुरल्या दोन जमिनी कूळकायद्यानं कुळाकडं अडकल्या. अडकतील नाही तर काय होईल? सोडवून घ्यायची काय खटपट केली? बाकीच्या भाऊबंदानी नाही जमिनी सोडवून घेऊन घरी कसायला सुरवात केली? मी म्हणते स्वतः जाऊन जमिनी कसणं राहिलं. पण निदान वरचेवर गावी जाऊन कुळाशी गोडीगुलाबीनं वागून वर्षबेगमीचं धान्य पदरात पाडून घ्यायला काय हरकत आहे? पण याना बसली जागा सोडायला नको. ऐतं बसून मिळेल ते गिळायला पाहिजे. अशानं कुठं संसार होतोय्. जमिनीचं उत्पन्न अगदीच आटलं, तसे दागिने मोडवायला सुरवात. दर महिन्याला एकेक दागिना सराफकट्ट्याची वाट चालायला लागला. लग्न होऊन या घरात आले, तेव्हा घातलेले सगळे दागिने अंगावर चढविले तर जडजड ओझं वाटायचं. पेढे घाटी डब्यात ठेवले तर डब्याचं झाकण लागायचं नाही. असा गच्च डबा भरायचा. पण माझीच मेलीची दृष्ट लागली आणि एकेक करता करता डबा पार रिकामा झाला. आणि असा दागिने मोडून कुठं प्रपंच होतो? काही बोलायला गेलं तर म्हणायचं होतं,

'अग, एवढा मळा ताब्यात येऊ दे. तोपर्यंत जरा दम धर. एक–तळ वीस एकराचा मळा आहे. एकरी कमीत कमी पांच हजारांची धारण म्हटली, तरी लाखभर रुपये येतील मळचाचे. लाखापेक्षा जास्तच; पण कमी नाही. तेवढे पैसे हातात आले, की तुझं घेतलं त्या दुप्पट सोनं घालतो तुझ्या अंगावर. तू कां काळजी करतेस?'

—मोठे देणार! यांचं नुसतं इनामदारी बोलणंच ऐकून घ्यावं. असला पैका हातात की दिवाळी. नाही म्हणजे मग असा शिमगा. डब्यातले आणि अंगावरचे सगळे दागिने संपले. चांदीची भांडीकुंडी होती त्यांचीहि वाट लावली. आता काय विकता? घर? विका तेवढं. म्हणजे झाडाखाली तीन दगड मांडते आणि झाडाच्या फांदीलाच जुनेऱ्याचा पाळणा बांधते. तरी बरं. या नव्यानव्या कायद्यामुळं घरावर कुणी कर्ज – वाम् देत नाही. म्हणून पोरीबाळींचा एवढा आसरा टिकून राहिलाय्. नाही तर हे चालले होते घर सुद्धा गहाणवट टाकायला. पण कुणी कर्जच देईना तेव्हा बसले चरफडत. आणि त्याचा राग काढला या देवघरातल्या चांदीच्या समईवर. कशी सुरेख समई होती. इथं अशी या कोपऱ्यातच होती. एका हातानं उचलायची नाही अशी जड आणि घणसर. पुन्हा कधी जन्मात बघायला तरी मिळणार आहे. शिवाय किती दिवसांची. पिढ्यापिढ्यांची. पण याना त्याचं काही वाटलं नाही. यांचा हात कचरला नाही. सरळ उचलली आणि आले विकून. बरं आल्या पैशातून लोकांची देणी तरी दिली? नांव नाही. देणी जशीच्या तशी उरावर. आणि समई विकून आलेल्या पैशांचं केलं काय? मरसराईची धोतर जोडी. आंब्याची करंडी. जिरगे तांदूळ. तूप. चार दिवस चंगळ. आणि फिरून येरे माझ्या मागल्या—

—देवा कसं व्हायचं? पोरीचं कसं व्हायचं? अन्नासाठी दाही दिशा व्हायची वेळ आली, तरी अजून यांचे डोळे कसे उघडत नाहीत? यांचा तक्क्या कसा सुटत नाही? दिवसभर बसून पान तंबाखू चघळायचा याना कंटाळा कसा येत नाही? चांदीची समई जाऊन तीन वर्षं झाली. आता त्यानंतर तांब्यापितळेची मोठमोठी भांडी विकायला देखील याना लाज वाटेना. काही तरी विकावं तेव्हा रेशनिंगचं धान्य आणावं अशी परिस्थिती आल्यावर लाज तरी कशाची वाटायची? दुसरी लाज मी म्हणते न वाटू दे. पण अरुणा माझ्या बरोबरीला आली. तरी घरात न चुकता पाळणा हालतोय् याची तरी लाज याना नको का वाटायला?

अरुणाच काय तिच्या पाठीवरची चित्री सुद्धा आता बाहेरची बसायला लागलीय् काय म्हणत असतील पोरी? कधी कधी मला बाहेर हाक मारणं होतं, तेंव्हा रात्रीचे पुरते दहा सुद्धा वाजलेले नसतात. अरुणा, चित्रा, दोघी जाग्या असतात. त्यांच्या देखत माजघरातून बाहेर जाताना जीव शरमेनं अर्धा होतो. बरं, एक दिवस नाही गेले तर दुसरा दिवस सगळा आदळा-आपटीचा. देवा, आता सोसवत नाही. जमिनी गेल्या जाऊ देत. दागिन्यांचा सोस तसा मला कधीच वाटला नाही. आणि दारिद्र्य तर माझ्या पांचवीलाच पूजलं होतं. माझा बाप तरी काय, महिना बारा रुपये मिळविणारा एक शाळामास्तर होता. पण रूपामुळं या इनामदाराच्या घरात पडले. कदाचित् माझाच पाय-गुण म्हणून लक्ष्मीची मर्जी या घरावर फार दिवस टिकली नसेल. दारिद्र्य आलं म्हणून माझी तक्रार नाही. एका एका घराला नसते लक्ष्मी धार्जीण. पण देवा, माझ्या जीर्ण झालेल्या या तब्येतीकडं बघशील की नाही? एका मागून एक पांच पोरी झाल्या. मधे तीन चार वाखे झाले. आता नुसतं चिपाड राहिलंय् माझं. तरी पाळण्याला खंड नाही. एकवेळ लाज लज्जा गुंडाळून ठेवते. नको ठेवायला? पण आता बाळंतपणाच्या त्या यमयातना नाही सोसवत. तापलेल्या सळया ओटीपोटातून खुपसाव्यात तशा चमका उठतात. जगते का मरते असं होऊन जातं.....ते ऑपरेशन का काय म्हणतात ते करून घ्या, म्हणून चाल वरजतेय्. नाही तर ते मेलं लूप का कुलूप ते तरी करा म्हणून हातापाया पडतेय् तर उलट माझ्यावरच गुरगुरतात.

'इनामदाराच्या वंशाला दिवा नको? आणि गंड पोरगा नाही ते काय नरकात पडतीस आणि मलाही पाडतीस तुझ्या बरोबर? मला जास्त अक्कल नको शिकवू. एक मुलगा होऊ दे, मग मी काय करायचं ते व्यवस्थित करतो.'



तोंड बघा व्यवस्थित करणाऱ्याचं. आजवर सगळा प्रपंच सुरळीत केलात. आता एक मुलगा झाला म्हणजे आणखी व्यवस्थित करा. नरकात पडणार म्हणे हे? आणि चाललाय् हा संसार काय नरकाहून निराळा आहे? बायकाना एक बाळंतपण म्हणजे नरकयातनाहून भयंकर कष्ट होतात. त्यात ना धड दूध तूप, ना धड शेक-शेगडी. बाराव्या दिवशी उठून चुलीपुढं कुकरून घ्यावं लागतंय्. देवा, मिळणारच असला तर पुढचा नरक परवडला. पण हा नरकवास पुरे. हे धिंडवडे पुरेत. एवढा या खेपेला मुलगा दे म्हणजे तरी बघते याना काही बुद्धी सुचते का—

आणि अचानक सरलाबाईना आठवण यायची की मुलगा व्हावा म्हणून तर आपण मध्यरात्री उठून हे व्यंकटेश स्तोत्राचं अनुष्ठान आरंभलंय्. या क्षणी आपण व्यंकटेश स्तोत्रच म्हणतोय्. कुठपर्यंत आलं होतं? कुठं पर्यंत? छे: आठवत नाही—

सरलाबाई पहिल्यापासून प्रारंभ करायच्या आणि कसंबसं स्तोत्र पुरं करून, अंधारातच देवापुढं नाक घासायच्या. म्हणायच्या,

'व्यंकटरमणा, माझा आता अंत बघू नको. या खेपेला मला एक मुलगा तरी दे नाही तर मरण तरी दे.'

—आणि त्या भक्तवत्सल दीन दयाळू व्यंकटरमणानं, सरलाबाईंची दुसरी मागणी तत्परतेनं मान्य केली. याहि खेपेला त्याना मुलगीच झाली. पण बाळंतपणाच्या दुसऱ्याच दिवशी त्याच्या अंगात जो ताप भरला तो तिसरे दिवशीपर्यंत उतरलाच नाही. आणि पुन्या चोवीस तासानंतर जो उतरला तो कायमचा. प्रदक्षिणा घालून थकलेलं आणि संसाराच्या चरकात पिळून निघालेलं सरलाबाईचं शरीर थंडगार पडलं.

सगळी गल्ली हळहळली. एकनाळकर इनामदारांच्या घराशी परिचित असलेली माणसं आपसात म्हणाली,

'या दामुआण्णानं आपल्या बायकोला घोसळून घोसळून मारली.'

'घरात बसून राहण्यापलीकडं आणि भसाभस पोरं काढण्यापलीकडं यानं दुसरं काही केलं नाही आजपर्यंत.'

'याच्या अंगाखाली बिचारी चिरडून मेली.'

'पण अशी नाजूक देखणी बायको मिळाल्यावर दामुआण्णा सारख्या निरुद्योगी माणसाला दुसरं काय सुचणार?'

'अहो, पण जरा तिच्या तब्येतीकडं तरी बघायला नको होतं का?'

'आणि सरलाबाई स्वभावानं सुद्धा अगदी गरीब गाय होती बघा.'

'तेच तर चुकलं. ती गरीब गाईसारखी होती म्हणूनच हा उंडारलेल्या वळूसारखा मोकाट सुटला होता. तिनं जरा त्राटिकेचा अवतार धारण करून या दामुआण्णाच्या नाकात वेसण अडकविली असती म्हणजे मग या बैलानं संसाराचं जू घेतलं असतं मानेवर.'

'हं: गेली बिचारी. पण आता चिल्ल्या पिल्ल्या पोरीनी कुणाच्या तोंडाकडं बघायचं? थोरली पोरगी काय जाईल लग्न होऊन. मग ह्या बाकीच्या पोरींचं कोण करणार?'

( पृष्ठ ५० वर पहा )

अनुक्रमणिका



# कविवर्य बा. भ. बोरकर

[ बोरकरांची कविता मी वाचली. खूप वाचली. मग अभ्यासलीही. (क्वचित् शिकविण्याचाही योग आला ) पण 'कवि तो आहे कसा आननी' हे पाहण्याचा योग मात्र आला नव्हता. कविवर्य तांबे ह्यांची कविता हा माझा एक खास आवडीचा व प्रेमाचा विषय. बोरकर त्याच कुलपरंपरेतले. त्यामुळे बोरकरांची कविता वाचताना माझ्यासमोर त्यांच्या व्यक्तित्वाची काही एक प्रतिमा साकारत होती. त्यांच्या काव्यातून ठिबकणारे सौंदर्य त्याच्या प्रतिमेत मी कल्पिले होते. त्यातले रंग, नाद, ताल, गंधादि सौंदर्यात्मक 'अनुभव' त्या प्रतिमेने मला दिले होते. त्यामुळे जी एक सौंदर्यमयी प्रतिमा मी मनोमन पहात होतो, ती मला प्रत्यक्षात जेव्हा मुंबई मराठी साहित्य संघाच्या (जुन्या) वास्तूत दिसली तेव्हा मला मनोमन आनंद झाला. ह्या गोष्टीला आता पंधरावर्षांहून अधिक काळ लोटला आहे. त्या दिवशी बोरकर स्वतःच्या कवितेसंबंधी बोलले होते. पण बोलताना जी श्रद्धा, जी समरसता, जे 'बुडून जाणे' मी अनुभवले होते, त्याचाच पुनः प्रत्यय मला ह्या नव्या मुलाखतीच्या वेळीही आला. बोरकरांची कवि-प्रतिभा ही त्यांच्यातल्या सौंदर्यवेधी व सौंदर्यवेड्या वृत्तीने घडविली आहे. तो वेध केव्हा लागला वा ते वेड नेमके केव्हा जडले हे त्यांचे त्यानाही सांगता येत नाही पण ते उसने नाही, उपरे नाही, नाटकी नाही हे मात्र मी अनुभवाने सांगतो. आमची मुलाखत रंगात आली होती. तेवढ्यात पलिकडच्या खोलीत रेडियोवर "भीमसेन जोशी" यांचे गाणे सुरू झाले. आणि क्षण दोन क्षण का होईना पण बोरकर 'हरवले'. नंतर जेव्हा ते परत भानावर आले तेव्हा म्हणाले "पुढील जन्म मिळालाच तर ही अपुरी राहिलेली इच्छा पूर्ण करून घेण्यासाठी झटेन." बोरकरांच्या व्यक्तित्वातच एक प्रकारचा गोडवा आहे. बोरकराना मी पंधरा वर्षांपूर्वी प्रथम पाहिले, त्यावेळी जी टवटवी त्यांच्या चेहऱ्यावर मला दिसली तीच आजही कायम आहे. बोरकराना जावई आले आहेत. पन्नाशी उलटून गेली आहे. आणि तरीही त्यांचे केस अजूनही काळेभोर आहेत. त्यासंबंधी बोलताना ते म्हणाले की, हा एक लययोग आहे. सौंदर्याच्या अखंड सहवासात राहिल्याने–काव्याची साधना केल्याने मी अजूनही तरुण राहिलो आहे. गहू वर्ण, धारदार सरळ नाक, विशाल भालप्रदेश, विपुल केशसंभार, शेलाटी देहयष्टी, मध्यम उंची, तीक्ष्ण व काव्यात्म अनुभव घेताना (व देतानाही) एक प्रकारचा 'स्पार्क' देऊन जाणारे बोलके डोळे, खास 'बंगाली' पद्धतीचा रेशमी झब्बा, धोतर, जाकीट, शाल, चपला, ही बोरकरांची व्यक्ति–प्रतिमा ! गेली कित्येक वर्षे हीच आणि अशीच! पण घरी गेलात तर 'बोरकर कवि ते हेच' असं खरंही वाटणार नाही. बोरकरांचा 'घरेलु' पोषाख आगळा आहे. बिनबाह्यांचा गंजीफ्रॉक आणि 'यावनी' (रंगीत व चौकटीची) लुंगी. तोंडात सिगारेट नेहमी 'आग' ओकीत असली, तरी त्या मुखातून मात्र स्रवते फक्त 'सौंदर्य'च! मग ते "सौंदर्य कधी रंगांचे असेल तर कधी प्रीतीचे! पण अंतर्बाह्य सौंदर्यच स्रवेल. ती मूसच मुळी सौंदर्याची आहे. बोरकराना कवितांप्रमाणेच काव्यचर्चाही आवडते. डोळसपणे करताही येते. त्यानी त्या शास्त्राचीही काही साधना केली आहे हे जाणवते. काही खोल आलेख मनावर कोरले जातात. बोरकरांची जशी कवितेत 'गति' आहे, तशी ती चित्रकलेतही आहे. त्यांच्या घरी त्यानी आपल्या पत्नीचे जे मोठे पोर्ट्रेट काढले आहे ते मी पाहिले आहे. 'दे ऑल्सो रॅन'मधले ते चित्रकार नाहीत. रंगाचे ज्ञान फक्त कवितेत नाही. ते व्यक्तित्वातच आहे. आणि म्हणूनच त्याना ही 'लाडीगुडी' जमली आहे. बोरकर तसे 'मूडी' आहेत. पण 'स्वाभाविक' ऋजुताही त्यांच्याजवळ आहे. त्यामुळे संतापाच्या भरात कधी कुणाला बोललेच तर नंतर त्याच्या घरी जाऊन क्षमाही मागतील. त्यामुळेच त्यांचा मित्रसंभारही मोठा आहे. त्यात एखादा अशिक्षित भंडारीही असू शकतो. त्याच्याशीही ते तासन् तास बोलू शकतात. त्यांच्या बोलण्यात आणि विशेषतः काव्यगायनात खास 'कोकणी' ढंग आहे. त्यातूनच त्यांचा असा आगळा 'ठसा' उमटून जातो. काव्यविषयक उदंड उत्साह काव्यचर्चा करतानाही कायम असतो. कवितेचे

## "कविता हा एक लययोग आहे. उत्कट प्रीतीतूनच हा लययोग साधतो. म्हणूनच मी, प्रीति आणि भक्ति (अध्यात्म) ह्यात अभेद मानतो"…. …. …. …. बा. भ. बोरकर

**'कुळ' 'धर्म' 'कुळाचार' सांगताना बोरकर खूप रंगून जातात. त्यामुळे मुलाखतीत नकळतच मोकळेपणा येतो—चर्चा दिलखुलासपणाने होते. कृत्रिम बंधने गळून पडतात. आणि आपल्याला तरी ह्यापेक्षा अधिक ते काय हवे असणार?]**

**प्र:**— काव्यरचना करायला तुम्ही सुरुवात कशी केली?

**बो:**— काव्य करतात, लिहितात असं मला ठाऊकच नव्हतं. त्याबद्दल मला काही जाणीवही नव्हती. आमच्या घरातच पदे, अभंग ह्यांचं एकच वातावरण होतं. रोजच्या भजनात काही विशिष्ट पदे व अभंग विशिष्ट अशा अनुक्रमाने गायली जात व ते झाल्यावर आम्हा मुलाना नवे पद वा अभंग म्हणावा लागे. एक दिवस मला ह्या गोष्टीचा विसर पडला. मग मी स्वतःच एक अभंग रचला. आणि त्या दिवशी तोच म्हटला. घरच्या मंडळीनीही त्याला योग्य ती साथ दिली. शेवटी 'बाकी' म्हणे आल्यावर मात्र सारी माणुसे गडबडली. भजन संपल्यावर काकानी मला बोलावून सांगितले कीं, संतांच्या अभंगात आपले नांव घुसडू नये. "संत झाल्याशिवाय अभंग करायचा नसतो " अशी समज आजीने दिली. आणि 'अभंग करणार नाही' अशी तिने माझ्याकडून शपथ घेवविली. काव्य केले जात नाही तर निसर्गातल्या अनेक वस्तूंप्रमाणे ते असते, अशीच माझी धारणा होती. ती बदलली आणि मी अभंग लिहिला त्याला एक कारण झाले. ते असे. आमच्या घराजवळच्या खिस्ती भंडाऱ्यांच्या वाडीत लग्न होतं. त्या लग्नाच्या वेळी पात्रिस नांवाच्या म्हाताऱ्या भंडाऱ्याने त्या प्रसंगावरच तिथल्या तिथे शीघ्र कविता केली आणि 'काव्य' करतात अशी जाणीव मला सर्वप्रथम झाली. आजीला वचन दिल्याने मी काव्य करण्याचे सोडून दिले होते. उमाळा वारंवार येत होता. पण तो मी दाबून टाकीत होतो. पण इंग्रजी तिसरीत असताना एक अगदी अकल्पित गोष्ट घडली. तिने माझ्या एकूण काव्यजीवनावर फार खोल ठसा उमटविला आहे. एक दिवस जनरल इंग्लिशच्या तासाला प्रिन्सिपॉलनी मला माडीवर जाऊन खडूच्या कांड्या आणायला सांगितल्या. मी गेलो. पण तिथे गेल्यावर रंगीत चित्रांच्या एका पुस्तकावर माझे लक्ष गेले. त्यातल्या चित्रानी मला आकर्षित करून घेतले. मी पाने उलटू लागलो. तेवढ्यात कुणीतरी मागून येऊन माझे डोळे झांकले. झांकणारा हात मऊ, लुसलुशित होता. माझा वर्गमित्र पाडस असेल अशी माझी कल्पना होती. पण चमकून मी मागे वळून पाहिले. मार्गारिदने माझा चटकन् मुका घेतला आणि ती हसत हसत खाली पळाली. माझ्या भोवतालचं जग पालटलं. सारं जग सौंदर्याने काठोकाठ भरून गेलं आहे असं मला जाणवू लागलं. मी कुठल्या तरी दिव्य जगात जाऊन पोहचलो होतो. त्या रात्रीचं ते धुंद चांदणं मला अजूनही दिसतं. तसं चांदणं मी पुन्हा कधी पाहिलं नाही. उत्तररात्रीपर्यंत मी त्याच चांदण्यात हिंडत होतो. आणि एकसारखा गुणगुणत होतो—

Robin, Robin, red breast  
Oh! Robin dear  
Robin sings so sweetly  
In the falling of the year.

**प्र:**— ह्या घटनेने तुमच्या काव्य-जीवनावर, काव्य-प्रकृतीवर काही खोल ठसा उमटला असलाच पाहिजे, नाही का?

### मुलाखत — प्रभाकर अत्रे

**बो:**—हो तर. त्यामुळे माझ्या मनावरची मोहर उडून माझ्या उत्कटतेला मोकळी वाट मिळाली असं मला वाटतं. उत्कट प्रत्यय—मग तो एकाद्या भावनेचा असो, रंगाचा असो, रूपाचा असो, गंधाचा असो कीं स्वरांचा असो मला माझ्या 'नंदनवना'ची दारे उघडून देतो. निसर्ग आणि भक्ति ह्यांच्या बाबतही असेच म्हणता येईल.

**प्र:**— आपल्या काव्य-साधनेच्या काळात आपल्याला कोणते मराठी कवि खास आवडले?

**बो:**—घरच्या भजनी परिपाठामुळे बरीचशी निवडक मराठी संत कविता मला मुखोद्गत झालीच होती. पुढे कवि कान्यांचा आणि माझा परिचय झाला. त्यांचे वडील आमच्या घरी राहून आपल्या संशोधनाचा उद्योग करीत असत. त्यांच्या आजारात कारे आमच्याकडे आले. त्या परिचयातूनच मराठी-

तले केशवसुत, वालकवि, गोविंदाग्रज, टिळक, विनायक, माधव ज्युलियन, यशवंत वगैरे कवींची कविता माझ्या वाचनात आली. माझे मराठी शिक्षण फक्त दुसरीपर्यंतच झाले होते. ह्या कवींचा परिचय–काव्यरूप झाला तो फार उशिरा. त्यांच्यातल्या चांगल्या कवितानी मला आनंदही दिला आणि मार्गदर्शनही केले. त्यातल्या त्यात वालकवि व गोविंदाग्रज ह्यांच्या काव्याची मला अधिक मोहिनी वाटली.

**प्र**:– मागे एकदा साहित्यसंघात बोलताना तुम्ही असं म्हणाल्याचं मला आठवतं कीं, तांबे हे काव्याच्या ओळी गुणगुणतच बाहेर येत. ते कधी काव्य करायला असे बसतस नसत. त्यामुळेच त्यांच्या कवितेत एकप्रकारची नादमयता, गेयता आहे. आपल्या कवितेतही हे नादांचे सौंदर्य जाणवते. आपल्याला काव्य कसे सुचते? आपली पद्धत काय?

**बो**:–प्रारंभी प्रारंभी एखाद्या कवितेच्या वाचनाने मनाला चटका लावला म्हणजे मी कवितेच्या वेगळचाच जगात विहार करीत असे. कधी एखादी चाल मला मोहिनी घालायची, तर कधी कवितेचा आशय, तर कधी वातावरण मोहवून टाकी. त्यातून माझी कविता गुणगुणत जन्म घ्यायची. पण त्यामुळे माझ्या आशयाचे वेगळेपण बाजूला पडे आणि अनुकरणच त्यातून प्रगट झाले. पण मलाही तांब्याच्याच प्रमाणे गात गात कविता 'होते'. स्वरांचा, नादांचा साक्षात्कार प्रथम होतो. त्यातून मी गुणगुणू लागतो. मलाही संगीताचे वेड आहे. त्यातून हे घडते.

**प्र**:– हे नेमके कसे घडते हे सांगता येईल काय?

**बो**:–हे नेमके कसे घडते त्यासंबंधीची Mental Process सांगणे कठिण आहे. ती समजत नाही. प्रेमात मनुष्य कसा पडतो




निवडणुकीचा निकाल!

हे समजत नाही. सांगता येत नाही. तसं काही तरी काव्यरचनेबाबतही म्हणता येईल. काही काही गोष्टी Instinctively होतात असे मला वाटते. परवा रात्री भीमसेनचे गाणे रेडियोवर होते. ऐकत पडलो होतो. ते गाणे ऐकत असताना मी अगदी भारावून गेलो. वाटलं "पुढचा एक जन्म केवळ गाणे शिकण्यासाठी घ्यायचा." माझ्या घरी मी माझ्या बायकोचे पोर्ट्रेट तयार केले आहे. तुम्ही पाह्यलं असेल ते.

**मी**:–"होय ना! ते तैलचित्र तुम्ही केले आहे हे मात्र मला आजच कळते आहे."

**बो**:–ते तैलचित्र पाहिल्यावर दीनानाथ दलाल म्हणाले– "बोरकर, तुम्ही जर चित्रकलेसाठी पांच वर्षे घालवलीत, ब्रशेस हाती खेळवलेत तर तुम्ही कवितेत जे नांव कमावलेत ते चित्रकलेतही कमवाल." आता सांगा. मी गाणं शिकलो नाही. चित्रकला शिकलो नाही. पण हे रंगांचं, नादांचं वेड माझ्यात Instinctively आलं आहे. त्यामुळे त्यातून जी निर्मिती होते तीही Instinctively च येते. खरोखरंच तुम्हाला आश्चर्य वाटेल, पुष्कळाना असं वाटतं कीं, बोरकरांचं संस्कृत फार उत्तम असलं पाहिजे. मी भरपूर संस्कृत काव्यांचं वाचन केलं असलं पाहिजे. पण मराठी शिक्षणाचीच जिथे वानवा तिथे संस्कृत शिकणार कुठून? मला शब्द-भांडार गवसलं ते संतपंतांच्या कवितेतून. विशेषत: ज्ञानेश्वरीतून! शब्दांच्या सौंदर्याचं आणि संगीताचं मला वेड आहे. त्यामुळे मी अजूनही वेडावून जातो. पण संस्कृतचा अभ्यास – प्रयत्नपूर्वक असा– मी पुण्यास १९४८ साली आल्यानंतर केला. संस्कृतचे शब्द-भांडार मला अचाट मोहिनी घालते. संस्कृत काव्याचे रसाळ अनुवाद आता मला सहज साधतात. कां? मला वाटते कीं, काही गोष्टी पूर्वसंचितामुळे होत असाव्यात. नाहीतर माझ्यासारखा मराठी दोन इयत्ता शिकलेला माणूस इतकी मराठी कविता लिहून जाताच ना!

**प्र**:– आपल्या काव्यनिर्मितीच्या प्रक्रियेसंबंधी नेमके काही सांगता येईल?

**बो**:–एखादा सौंदर्यात्मक अनुभव येतो तेव्हा तो काव्यात आकारबद्ध झाल्याशिवाय मला चैनच पडत नाही. मी अगदी अस्वस्थ होतो. परवाचीच गोष्ट सांगतो. आमच्या सचिवालयातून मी बाहेर पडलो. 'टॅक्सी'त बसलो. तेवढ्यात एक तरुण स्त्री आणि तिची आई माझ्याजवळून गेल्या. त्या तरुणीला मी पाहिले आणि असामान्य सौंदर्याने मी भारावून गेलो. त्या सौंदर्याची आकृति माझा पाठलाग करीत होती. 'कविता' होत होती. मला त्यावेळी वेळ नव्हता. पण कवितेने माझा पिच्छा सोडला नाही. बेती–पुणे प्रवासात शेवटी ती पूर्ण झाली. तुम्हाला दाखवतो हं (असं म्हणून बोरकर पलिकडच्या दालनात गेले. व आपली बॅग घेऊन आले. त्यानी ती कविता गाऊन दाखविली. कवितेचा कागद मला दाखविला.

त्याखाली लिहिले होते. "बेती–पुणे प्रवासात – दिनांक १३–८–६६) एखादी ओळ मला सुचते. मी गुणगुणू लागतो. कविता होते आहे हे मला जाणवते. मी ती होऊ देतो.

**प्र**:–पण अशा पद्धतीत मग काही कविता अपुऱ्या राहातात? काही विषय निघून जातात?

**बो**:–कविता होत असताना मला जर कुणी हटकले नाही तर माझी कविता सहसा अपुरी रहात नाही. तो सौंदर्यात्मक अनुभव मुळी मी जगतच असतो. पण कविता होत असता-नाची माझी जी एक विशिष्ट भावसमाधि असते तिचा कुणी भंग केला तर मात्र ती कविता अपुरीच राहते. पुन्हा मला ती पूर्ण करता येत नाही असा माझा अनुभव आहे. एक अनुभव सांगतो. एकदा मी आणि माझा भाऊ पुण्याला मुळा मुठा संगमावर गेलो होतो. पुण्यात माझे जे काही आवडते Spots आहेत, त्यात तो संगमाचा एक आहे. दिवस पावसाचे होते. आम्ही तिथे पोचलो, तेव्हा एकदम पाऊस बरसू लागला. आम्ही जवळच्या धर्मशाळेत थांबलो आणि एकदम माझ्या मुखातून काव्यपंक्ति बाहेर पडली "घन वरसे रे". कविता होते आहे याची जाणीवहि मला झाली नाही. मी खुल्या आवाजात गाऊ-लागलो...

**घन वरसे रे—घन वरसे रे.**<br>
**वरसे जलसर—आले सरसर**<br>
**मल्हाराचे स्वरसे रे—घन वरसे रे।।**<br>
**भरूनी आले नदि – नद–नाले**<br>
**जरठ तरूहि जाहले रसाले**<br>
**पल्लव द्रुमही न्हाले धाले**<br>
**जणु मोराचे परसे रे।। घन वरसे रे।।**

तेवढ्यात भावाने मला विचारले–"आबा, कुणाची रे ही चीज?" हे गीत 'मल्हार' रागातल्या सुरावटीत गात होतो. पण रागाची जाणीव नसताना त्याने मध्येच प्रश्न विचारला आणि 'कविता' थांबली, ती कायमची. ती कधीच पूर्ण होऊ शकली नाही. '**गिताऱ**' ह्या कविता संग्रहात आलेली 'चोरपावली दुपार' ही कविता अशीच अपूर्ण कविता म्हणून पडून होती. पाडगावकर म्हणाले कीं, ती कविता आहे ह्या स्वरूपात सुद्धा पूर्ण वाटेल. म्हणून ती त्या संग्रहात समाविष्ट करण्यात आली पण कित्येक वर्षांनंतर !

खरं सांगायचं तर काव्यरचनेच्या प्रक्रियेबद्दल काही निचित सांगणंच कठिण आहे. Complicated process आहे तो! एखादी गोष्ट तुमच्या जाणीवेला कळणे आणि बुद्धीला कळणे या गोष्टी मुळातच वेगळ्या आहेत. सुग्रण बाईला विशिष्ट वेळी विशिष्ट वास येतो आणि पदार्थ तयार झाला आहे याची नेहमी जाणीव होऊन ती भांडे चुलीवरून उतरते. हे तिला कसं कळतं? काव्य–प्रक्रियेबद्दलही असंच म्हणता येईल.

**प्र**:— आपल्या काव्यात ज्या प्रतिमा येतात त्यांच्या Associations संबंधी काही सांगता येईल काय?

**बो**:—मला तरी त्या प्रतिमा दिसतातच मुळी! आता माझी **जपानी रमलाची रात्र** ही जी कविता आहे तिचीच गोष्ट सांगतो. १९४३ साली ती मी लिहिली. अमेरिकन-जपानी युद्धकैद्यांची देवाण घेवाण व्हायची होती. मी जपान पाहिला नव्हता. पण एका सुंदर जपानी 'गायेशा'चे चित्र मी पाहिले होते. त्यातून कां कुणास ठाऊक पण त्या कार्यक्रमाला जाण्याच्या कल्पनेने मी भारावून गेलो होतो. पण जाऊ शकलो नाही. पण गेला नाहीत तरी You can visualise the things! भावनेचा पारा चढत जातो तेव्हा हे शक्य होते. प्रतिमा दिसू लागून वाणी प्रगट होते, हीच **पश्यन्ति वाणी**! त्या भावावस्थेत सारे मुळी दिसूच लागते. प्रयत्न असे करावेच लागत नाहीत. **'क्षाळी पद संध्या'** ह्या कवितेच्या बाबतीत टीका झाली. 'कालिदासा'चे नाते जोडले गेले. पण मी कालिदास तोपर्यंत वाचलाही नव्हता. एखादा अनुभव अभिव्यक्त होत असताना माझी सारी ज्ञानेंद्रिये ताणली जातात. 'रमलाची रात्र' कविता लिहीत मी टेबलाशी बसलो होतो. मला एक सारखा हिंगाचा वास येत होता. मी आईला—बायकोला विचारले. त्या म्हणाल्या 'तिथे कशाला हिंग येईल?' मी मात्र अस्वस्थ झालो. शोध केला तेव्हा हिंगाचा एक बारीकसा खडा 'अमृतांजना'च्या रिकाम्या बाटलीत पडलेला होता. त्याचा नेमका त्याच वेळी तेवढा मला वास कां यावा? प्रतिमांच्या बाबतीतही नेमके हेच घडते. त्या असतात. दिसू लागतात. जाणवू लागतात. त्यांचा 'वास'च येऊ लागतो मुळी. हे नेमके कसे घडते हे मात्र मला सांगता येत नाही. माझे पाठांतर फार नाही. पण सृजनशील अंत:कोपातला साठा मात्र खूप मोठा आहे. त्याला स्पर्श होतो. शब्द साकारतात!

**प्र**:— ह्या शब्दसंपत्तीबद्दल व वाङमयीन कर्तृत्वाबद्दल आपल्यावरील संस्काराना आपण कितपत श्रेय द्याल?

**बो**:—त्याला मी फार मोठे श्रेय देईन. माझ्या लहानपणी जे वातावरण होतं ना It was surcharged with all cultural details. माझ्या मनावर तेच फार प्रभावी असा परिणाम करून गेले असले पाहिजे. आताच आपण प्रतिमांवरून, शब्दकळेवरूनच बोलत होतो ना. माझ्या मनावर ह्याचा संस्कार किती दृढ आहे व तो कसा परिणाम करून जातो ते पहा. माझ्या 'दूधसागर' ह्या कवितेत **'लासल्या** गिरी दरी' अशी एक ओळ आहे. आता हा **लासल्या** शब्द कुठून आला म्हणून पृच्छा करण्यात आली. पण त्याचे मूळ सोयरोबांच्या एका अभंगात आहे पहा.

**लटके खरे करी बासून**
**संसारी जो घेतो घासून**
**नक्कल करी मारी हासून**
**त्रिविध तापे घेतो 'लासून'**
**कोण्या कामाचा काय हा असून**
**तो काय प्राणी विसरला हरिला जन्मापासून**
**—सोयरोबा.**

तेव्हा प्रतिमा सुचतात कशा, शब्द सुचतात कसे हे नेमके सांगणे कठिण आहे. या गोष्टी प्रतिभेच्या परिसस्पर्शानं एकाएकी जिवंत होऊन उठतात एवढेच मी म्हणेन.

**प्र**:— काव्याचा Conscious effort केव्हा केलात?

**बो**:—प्रारंभी मी सांगितलंच कीं, कविता असते अशीच माझी समजूत होती. पण पात्रिसच्या त्या शीघ्रकवितेमुळे कविता करता येते, करावी लागते ही जाणीव मला प्रथम झाली. 'बाकी म्हणे' म्हणून जो मी अभंग त्या रात्री आमच्या घरी म्हटला तो माझा काव्य विषयक पहिला Conscious effort होता असं म्हणता येईल.

**प्र**:— आपल्या कवितेत उत्कट प्रीतीप्रमाणेच उत्कट भक्तीचीही कविता विपुल आहे. ह्याबद्दल काही सांगता येईल काय?

**बो**:—प्रीति आणि भक्ति किंवा प्रीति आणि अध्यात्म ह्यात मुळात काही भिन्नता आहे असे मी मानीत नाही. **"हुशार भाई"** म्हणून माझी एक कविता आहे. तुम्हाला ती वाचूनच दाखवितो. (कविता—बोरकरांची कविता. पृष्ठ ११२) (बोरकर संपूर्ण कविता वाचून दाखवितात.)

**सगळी सृष्टी, हिंद समष्टी**
**एकच अथवा जिवलग व्यष्टी**
**जीवेभावे कुणावरी तरि**
**प्रीतीची अतिवृष्टि करा रे!**
**प्रेमाचे साकार सानुलें**
**रूप जरी रे मनुज देहघर**
**तिलांजली द्या सर्वस्वावर**
**आणि दृष्टिचे तेज वाढवा.**
**विराट तेजे प्रगटुनि दाविल**
**विश्वरूप दर्शने तुम्हाला**

कविता हा एक लययोग आहे. ती एक साधना आहे. मी उत्कट प्रीति हीच महत्वाची मानतो. हे सारे जीवन ह्या प्रीतिविषयक श्रद्धेतून घडले आहे. ती श्रद्धा माझ्या भोवतीच्या वातावरणातूनच जोपासली गेली आहे. हा लययोग कबीराला साधला. तो म्हणतो कीं, गोपी कुठे अध्यात्म शिकल्या होत्या? पण त्याना तो लययोग साधला. म्हणून त्याना कृष्ण कळला. वर्षानुवर्षे पुस्तके पाठ करणाराना तो कळत नाही, गवसत नाही. उत्कट प्रीतीतूनच हा लययोग साधतो. म्हणून मी

## आम्ही असे लिहितो

गेले वर्षभर 'दीपावली'तून प्रसिद्ध होणाऱ्या मुलाखत मालेतील ही शेवटची मुलाखत. मुलाखत मालेचे असंख्य रसिक वाचकानी पत्रे लिहून स्वागत केले. त्या साऱ्या ज्ञात—अज्ञाताना धन्यवाद !! **मग आजच्या, नव्या दमाच्या लेखकांचे काय**? उत्तरासाठी—'दीपावली'चा पुढील अंक वाचा.

प्रीति आणि भक्ति (अध्यात्म) यात अभेद मानतो.

**प्रः–** हा लययोग आपल्याला काव्याबाबत साधला आहे तर!

**बोः–** माझ्यापुरता निश्चितच. Whenever I am in communion with my poetry, I am young!

**मीः–** म्हणजे प्रौढत्वी निज शैशवास जपणे असं म्हणायचंय?

**बोः–** छेः छेः जपण्याचा प्रश्न येतोच कुठे? I am young! माझे सारे केस अजून काळे आहेत. वृत्ति तरुण आहे. सौंदर्याचं वेड कायम आहे. ताजं आहे. माझ्या काव्यामुळेच हे सारे सहज शक्य झालं आहे.

**प्रः–** काव्याला काही वर्ज्यावर्ज्य?

**बोः–** जीवनातही काही मी वर्ज्य मानले नाही. कवितेतही मी काही वर्ज्य मानीत नाही. ह्या साऱ्या पसाऱ्याकडे पाहण्याची जर काव्यात्म पण तटस्थ अशी दृष्टि असेल तर काही वर्ज्यावर्ज्य मानण्याची गरज आहे असे मला वाटत नाही.

**प्रः–** गोवामुक्तीच्या लढ्यात आपण भाग घेतला होता. त्याचा आपल्या वाङमयीन वाटचालीच्या दृष्टीने काय फायदा वा तोटा झाला?

**बोः–** त्या काळात एक गोष्ट निःसंशय झाली. मी जे Risks घेतले, जे जे कष्ट भोगले त्यामुळे माझे व्यक्तिमत्व खंबीर व सबल झाले. त्या आधीच्या काळातल्या माझ्या काव्यविषयक कल्पना काहीशा स्वप्नाळू होत्या. I had my own world of dreams पण त्या काळात माझा जीवनातल्या Realities शी संबंध आला. काही भयानक अनुभवातून मी गेलो. त्याचा परिणाम **'आनंदभैरवी'** तल्या कवितांतून दिसेल. कदाचित् त्यातल्या सर्वच कविता Artistically जमल्या नसतील-because I had lost my paradise! पण त्यातूनच मला दुसरा नवा Paradise गवसला. It was Paradise — regained हे निश्चित.

**प्रः–** ह्याच संदर्भातला एक प्रश्न—आपण 'महात्मायन' लिहीत होता. त्याचे पुढे काय? आपण तो प्रयत्न सोडून तर दिला नाही ना?

**बोः–** प्रयत्न सोडून दिलेला नाही. त्याचा मला फार घोर लागलेला आहे. तो पुरा झाला नाही, तोपर्यंत मी कवि म्हणून ऋणमुक्त नाही असेच मला वाटते.

**प्रः–** कलावंतातल्या Man & Artist मध्ये कधी संघर्ष येतो? वातावरणाचा आग्रह असतो आपला?

**बोः–** माझ्या मते Man & Artist यांचे सख्य सांभाळीतच कलेला आपला प्रवास करावा लागतो. पूर्वी माणसे Isolate होऊ शकत होती. आज माणसातल्या कलावंतावरील आक्रमणे वाढली आहेत. त्या साऱ्या आक्रमणाना तोंड देत देत कलावंताला आपल्या कलाविषयक श्रद्धांची जपणुक करावी लागते. त्यातून Creative जग कायम राखणे तसे कठिण आहे. पण ते करणे भागच आहे, आवश्यक आहे, नाही का?

**प्रः–** विशिष्ट वातावरण, जागा, वेळ वगैरेंचे बंधन मानता?

**बोः–** वातावरण, जागा, वेळेचे कसलेही बंधन माझ्या निर्मितीच्या आड येत नाही. मी कवितेत बुडालो कीं, मग भोवती रेडियो चालू असला वा ढोल, ताशे वाजवले तरीही माझी समाधि भग्न पावत नाही. कविता केव्हाही, कुठेही, कोणत्याही वेळी सुचते. आणि मग ती पूर्ण केल्याशिवाय मी उठतच नाही. मी मध्येच थांबलो कीं, ती कविता वाया गेली असेच होते. वातावरणाबाबत म्हणाल तर माझ्या काही कविता कारे यांच्या प्रेसमध्ये बसून मी लिहिल्या आहेत. कवीनं हवं ते वातावरण कल्पनेनेच आपल्या भोवती निर्माण करावयाचे असते.

**प्रः–** आपल्या वाङमयनिर्मितीत कवितांबरोबरच, कथा–कादंबऱ्या ललित निबंधही येतात. आपण गद्य लेखनाकडे कसे वळलात?

**बोः–** गद्य लेखनाकडे मी वळलो त्याचे श्रेय श्री. भाऊसाहेब खांडेकर यानाच द्यावे लागेल. वामन मल्हारांनंतर मराठी वाङमयातली मूर्तिमंत सुजनता म्हणजे वि. स. खांडेकर. खांडेकरानी रसिकतेने, येणारी साहित्यिकांची पिढी जोपासली. तिचे कौतुक केले. माझ्या 'जीवनसंगीता'ला खांडेकरांची प्रस्तावना आहे. कुसुमाग्रजांच्याच बाबतीतला एक किस्सा सांगतो. भाऊसाहेब शिरोड्याला होते. त्यानी मला तेथे असताना काव्यगायनाला बोलावले होते. मी गेलो पण कुसुमाग्रजांच्या 'स्वप्नाची समाप्ति' ह्या तेव्हा प्रसिद्ध झालेल्या कवितेने भारावूनच. मी त्याना म्हटले कीं, मी माझ्या कविता म्हणण्या-

पूर्वी मराठीतल्या एका श्रेष्ठ कवीची कविता मी म्हणून दाखविणार आहे. मी ती आधी म्हटली. खांडेकराना ती फार आवडली. त्यातून त्यांचा परिचय झाला व 'विशाखा' संग्रहाची उभारणी झाली. खांडेकरांच्या 'ज्योत्स्ना' मासिकातून आम्हा दोघांच्या कविता त्यावेळी प्रसिद्ध होत होत्या. एकदा कविता पाठवली गेली नाही. खांडेकरांचे पत्र आले. मी त्याना लिहिले, "कवितेऐवजी दुसरे काही चालेल काय?" त्यांचा होकार आला. मी ललित निबंध पाठविला. मग 'प्रियदर्शनी' ह्या नावाने कथाही लिहिल्या. कादंबऱ्या लिहिल्या.

**प्र**:– कादंबऱ्यांबाबत प्रश्न विचारतो. आपण सारे कथानक जुळवून प्लॅन करून मग लिहायला बसत होता ?

**बो**:–स्थूल आराखडा ठरवून लिहीत असे. तपशील लिहिताना भरला जात असे.

**प्र**:– मूळ रूप बदलते असे कधी घडले?

**बो**:–घडले. कथानकातल्या व्यक्ति स्वतःचेच रूप धारण करतात. आणि मी मग त्याना त्यांच्या गतीने जाऊ देतो. त्यांच्या त्या प्रवासाला साथ देणे एवढीच भूमिका मग लेखकाची राहते असे मला वाटते.

**प्र**:– आपण कादंबरी लेखन तूर्त सोडलेले दिसते.

**बो**:–सोडले आहे. पण त्याची खास कारणे नाहीत. माझ्या गद्य लेखनाकडे रसिकांचे किंबहुना टीकाकारांचे म्हणावे तसे लक्ष गेले नाही त्यामुळेही कदाचित् त्याबाबतचा माझा उत्साह मावळला असावा. विशेषतः 'भावीण' लिहिली ना तेव्हा काही एक वेगळी अपेक्षा होती. पण ती प्रसिद्ध झाल्यानंतर मला अपेक्षित असलेला Response मिळाला नाही.

**प्र**:– साहित्यातल्या कलाकृतींची अन्य भाषात भाषांतरे होण्याचे भाग्य तुमच्या काही कलाकृतींना लाभले आहे असे मी पाहतो. लेखकाच्या कलानिर्मितीचे ते यशच नव्हे काय?

**बो**:–तसे मानायला हरकत नाही. **भावीण** ही कादंबरी तशी भाग्यवान ठरली. हिंदीत तर तिच्या दोन आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या आहेत. गुजराती, तामीळ व बंगालीतही तिचे भाषांतर झाले आहे. आणि कानडी भाषांतर प्रेसमध्ये आहे.

**प्र**:–आपल्या साहित्याबाबत 'बक्षीस' योगही बरा दिसतो.

**बो**:–होय! आनंदभैरवी, आनंदयात्री, चित्रवीणा, गितार ह्याना शासकीय खास बक्षिसे मिळाली आहेत. पण मला **'आनंदयात्री'** ह्या टागोर शताब्दीच्या निमित्ताने मी लिहिलेल्या पुस्तकाबाबत विशेष अभिमान वाटतो. त्यावेळी प्रवासी वंग संमेलन भरले होते. त्याचा मी अध्यक्ष होतो. माझ्या वेषामुळे मी बंगाली आहे अशीच पुष्कळांची समजुत झाली. बऱ्याच जणानी मला तसे विचारलेही. टागोर ह्यांचे संबंधी माझे काही कर्तव्य आहे असे मला वाटत होते. **'आनंदयात्री रवीन्द्रनाथ'** लिहून मी ते कर्तव्य पार पाडल्याचे समाधान मिळवू शकलो.

**प्र**:–आपण कविता लिहून झाली कीं कुणाला वाचून दाखविता ?

**बो**:–त्याशिवाय मला चैन वाटत नाही. घरातली सारी माणसे भोवती जमवून मी त्याना नवी कविता म्हणून दाखवितो. घरी आलेल्या रसिक मित्रानाही प्रसिद्धीपूर्वी ती वाचून दाखवितो.

**प्र**:–वाङ्मयीन टीकेचा सृजनशील साहित्य निर्मितीला कितपत उपयोग होतो?

**बो**:–Creative process जाणून घेणारा डोळस व सहृदय मित्र भेटला तर त्याची टीका ही पुष्कळदा उपयोगी ठरू शकते असे मला वाटते. पण अशी टीका मला फारशी लाभली नाही. पण अलिकडच्या काळात मंगेश पाडगांवकर यांचा माझा जो संबंध आला तो मला उपयुक्त ठरला आहे, असे मला वाटते.

**प्र**:–कविवर्य तांबे यांचा वारसा काव्यक्षेत्रात आपण चालवीत आहात असे म्हटले जाते. तांब्यांच्या काव्याची ही मोहिनी आपल्याला कशी पडली?

**बो**:–तांबे यांच्या कविता वाचण्यापूर्वी मी अनेक कवींच्या कविता वाचल्या होत्या. नंतरही वाचल्या. पण तांबे यांच्या प्रमाणे माझ्या संपूर्ण व्यक्तित्वाचा ताबा मात्र कुणी घेऊ शकला नाही. मला त्यांच्यात माझा समानधर्मा भेटला होता. तांबे ह्याना चित्र, स्वर, नाद, रंग ह्यांचे आकर्षण होते. शिवाय ह्या सौंदर्याच्या साक्षात्कारातून जीवनाचे रहस्य समजून घेण्याची अनिवार ऊर्मि तांबे यांच्या ठिकाणी होती. सौंदर्याचे त्याना प्रभावी आकर्षण होते. तांबे ह्यांच्या व्यक्तित्वातला तो पदर माझ्यात आहे. ग्वाल्हेर आणि गोवा ह्यात काही एक साम्य आहे. उत्तरेकडचे Muslim Influence ग्वाल्हेरवर आहे. तर गोव्याचे बाबतीत Latin Influence आहे. ह्या दोन्ही समान वातावरणात तांबे आणि माझे व्यक्तित्व काही एक विशिष्ट आकार घेऊ शकले. नादमयता, गेयता हा भाग वरवरचा आहे. सौंदर्याचा साक्षात्कार व त्यातून जीवनाचे रहस्य जाणून घेणारी शोधक बुद्धि ही माझ्या त्यांच्यात एक आहे. म्हणून मला त्यांच्यात उद्याचा मी दिसलो. एकलव्याप्रमाणे मी तांबे यांच्या बाबतीत वागलो. "माझे हात आता थकले आहेत आणि कान तुमच्याकडे लागले आहेत." हे त्यांच्या शेवटच्या दिवसातले वाक्य मी जन्मात विसरणार नाही. त्यानी ऊर भरून माझं असं कौतुक केल्यामुळे टीकाकारानी माझा आंगठा कापून घेतला याचं दुःख मला फारसं जाणवलं नाही.

**प्र**:–बोरकरसाहेब, आता शेवटचा प्रश्न विचारतो हं ! कलेकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोन—एखाद्या Slogan च्या स्वरूपात सांगता येईल?

**बो**:–I don't believe in Slogans! पण स्लोगनच हवी असेल तरी घ्या लिहून "Artist must be true to himself above anything else!" ●●●

अनुक्रमणिका

# करायला गेलो एक



**आरामशीर पहुडलेल्या कमलच्या सुस्त देहाकडे नेहमीप्रमाणे बापू आपल्या खिडकीतून अनिमिष नेत्रानी मजेत पाहत राहिला. तोच, अनपेक्षित घटना घडली कमलने अर्धवट उघडे ठेवलेले दार लोटून खुद्द मधुकर खोलीत शिरला, कमल झोपलेली आहे हे पाहून त्याने दार आड केले आणि चोरट्या पावलानी तो तिच्याकडे वळला. तिचा चेहरा न्याहाळून पाहू लागला. आता अवेळी आलेला मधुकर पुढे काय करतो ते बापू दाराआडून एक टक पाहू लागला. . . .**

—पंढरीनाथ रेगे

**मालवणच्या** शिनारी आळीतील काका शिनाऱ्यांचा सर्वात धाकटा सुपुत्र बापू मॅट्रिक पास झाला, तेव्हा त्यांचे माडीचे कौलारू घर, घरच्या कर्त्या पुरुषाबरोबर अभिमानाने फुलून निघाले:— घरधन्यासारखी त्याचीही कान्ति उजळून निघाली. त्या इमल्याने आजवर खूप मालमत्ता अंगावर खेळवली होती. संपत्ती व ऐषआराम उपभोगला होता. पण या दिवसासारखी छाती फुगविणारी गोष्ट या घराने यापूर्वी कधी अनुभवली नव्हती. उगाच का काकानी चक्क दहा किलो पेढे वाटले ? आपल्या दलाली दुकानाच्या पेढीवर मुळी त्यानी पेढ्यानी भरलेली परातच ठेवली होती. बाजारात पेढीपुढून जाणाऱ्या पोराटोरापासून थोरामोठ्यांपर्यंत प्रत्येकाला अगत्याने बोलावून काकानी त्याच्या हातावर पेढा ठेवला होता, आणि 'आमचा बापू मॅट्रिक पास झाला हो !' हे शुभवर्तमान मोठ्या अभिमानाने सांगितले होते. काकानी आपला नेहमीचा अलिप्त आढ्यतेचा मुखवटा यावेळी दूर झुगारून दिलेला होता. त्यांच्या हातून पेढा घेताना त्यांच्या या नव्या अवताराकडे पोराबाळानी कुतूहलाने पाहिले होते व ती अचंबा करीत निघून गेली होती.

त्यानाच काय, तुम्हालाही या गोष्टीचा अचंबा वाटणे साहजिक. नाहीतर काय ? य:कश्चित् मॅट्रिक परीक्षा आपला मुलगा पास झाला म्हणून एवढा का सोहळा करायचा ? मालवणसारख्या कोकणी गावात झाली तरी मॅट्रिक पास होणे ही नवलाईची गोष्ट का उरली होती ? दरसाल किमान एखादा शेकडा तरी विद्यार्थी खुद्द मालवणात मॅट्रिकच्या परीक्षेतून पसार होत होते. नाही म्हटले तरी शहरवजा तालुक्याचे गाव होते ते. आता तर तिथे कॉलेजही निघाले होते. त्यातून वर्षाकाठी पाचपन्नास पदवीधरही बाहेर पडू लागले होते. मग ?— बापू साधा मॅट्रिक झाला— तोसुद्धा त्या उंबरठ्यावर दोनदा ठेचकाळून तिसऱ्या वारीला. अशा स्थितीत खुद्द बापाने झाले म्हणून एवढे का कौतुक करायचे ?— असा प्रश्न तुम्हाला पडणे रास्त. पण शिनारी घराण्याच्या इतिहासात जरा डोकावण्याचा प्रयत्न केलात, तर ...

बापू मॅट्रिक झाला म्हणून काका शिनाऱ्यांच्या कुटुंबात त्याच्या कौतुकाला पारावार उरला नाही हे तर खरेच ! पण त्याचे इंगित होते ते असे— मॅट्रिकचा शिक्का संपादन करणारा बापू हा शिनारी घराण्यातला पहिला वहिला मानकरी ठरला होता. आणि म्हणूनच

त्याच्या पिताजींना स्वर्ग दोन बोटे उरल्याचा भास होऊ लागला. 'स्वर्ग दोन बोटे उरला' म्हटले ते अशासाठी की — आता चिरंजीव बापूने एकदाचा पदवीचा शिरपेंच पटकावला की, त्यांना प्रत्यक्ष स्वर्गाला हात टेकल्यासारखे वाटणार होते.

काकांना असे वाटायला कारणच तसे होते. मालवणचे आघाडीचे दलालीचे व्यापारी म्हणून त्या पंचक्रोशीतच काय, पण जवळपासच्या दक्षिण कोकणात शिनाऱ्यांची पेढी नावाजलेली होती. आज कित्येक वर्षे मालवण भागात व्यापारामध्ये काकांचा हात कुणी धरू शकला नव्हता. नव्हे, 'मी', 'मी' म्हणवणाऱ्या व्यापाऱ्यांना त्यांनी चांगलाच हात दाखवला होता. परंतु व्यापारात अट्टल डोकेबाज ठरलेल्या त्यांच्या कुटुंबातील कुणाचेही डोके शिक्षणात मात्र आजवर फारसे चालले नव्हते. मॅट्रिकच्या उंबरठ्यापर्यंतही कुणी मजल मारू शकला नव्हता. व्यापारात गती मिळविण्यापुरते कामचलाऊ शिक्षण अवगत झाल्याबरोबर ज्याने त्याने अभ्यासात जास्त डोके नाहक खर्ची घालण्याचा नाद सोडला होता, आणि व्यापारातच आपली अक्कलहुशारी दाखविण्याचा व्यवहारी मार्ग पत्करला होता.

तसे म्हणजे शिक्षणात कुणी प्रावीण्य न दाखविल्याची फारशी खंत त्या घराण्यात कधी कुणाला वाटली नव्हती. आणि गेल्याच्या आधल्या वर्षी मुंबईचे एक नातेवाईक हेडक्लार्क त्यांच्याकडे आले नसते, तर त्या खंत-खेदाचा संपर्क त्यांना बाधण्याचा फारसा संभवही नव्हता, परंतु त्या हेडक्लार्कसाहेबांनी आपल्या कुटुंबातील एकेका पदवीधराचा उल्लेख कौतुकाने काकाजींसमक्ष केला, आणि तेव्हाच प्रथम काकाजींना त्या गोष्टीची खंत वाटली— एवढ्या मोठ्या कुटुंबाचे न्यून डाचू लागले. मॅट्रिकच्या उंबरठ्यावर दोनदा ठेचकाळलेल्या आपल्या धाकट्या चिरंजीवाला—बापूला त्यांनी चिकाटीने रेटीत रेटीत, तिसऱ्या खेपेला का होईना, पण मॅट्रिकचे सोपान चढायला भाग पाडले ते याच जिद्दीने. आणि ती परीक्षा बापूने पसार करताच त्यांनी पेढ्यांची खैरात केली, ती पहिली महत्त्वाकांक्षा पुरी झाल्याच्या आनंदाने. आता तेवढी ती पदवीची माळ त्याच्या गळ्यात पडली, कीं त्यांना कृतकृत्य झाल्याचे समाधान लाभणार होते.

बापूला एकदाचा मॅट्रिकचा टिळा तर लागला. आता त्याला कॉलेजात घालण्याचा प्रश्न आला. खुद्द मालवणला कॉलेज निघालेच होते. परंतु तिथल्या गावठी कॉलेजात आपल्या कुलदीपकाने जावे हे श्रीमंत काकाजींना काही इष्ट वाटेना. प्रत्यक्ष मुंबईला जाऊन त्याने कॉलेजचे चांगलेसे शिक्षण घ्यावे असा त्यांचा निर्णय ठरला. बापूलाही मनातून तेच हवे होते. (आता त्याचा हेतू वेगळा होता ही गोष्ट सोडा. अंदरकी बात सांगायची म्हणजे पदवीचे काय होईल ते बरेवाईट होवो; पण नवनवीन हिंदी-मराठी-इंग्रजी सिनेमा मुंबईत ताजोताज पहायला मिळणार होते, म्हणून तो खूष होता. तसा म्हणजे त्याने सिनेमा पाहण्याचा श्रीगणेशा मालवणातच गिरविलेला होता. पण ते जुनेपुराणे झालेले तुरळक हिन्दी-मराठी चित्रपट पाहणे म्हणजे दुधाची तहान शिळ्या ताकावर भागवण्यासारखे. मुंबईला जाण्यामागे बापूचा दुसरा मतलब होता तो असा— एवीतेवी त्याने पदवी मिळवावी म्हणून पिताजींनी चंगच बांधला होता. तेव्हा कॉलेजात जाण्यावांचून गत्यंतर नव्हते. तर निदान मुंबईला जाऊन जीवाची चैन करता येईल ती तरी साधावी. घरी पैशाला काही तोटा नव्हताच. मग संधी कां सोडा ? मुंबईत विद्यादेवी एकवेळ प्रसन्न झाली नाही, तरी एखादी ललनादेवी तरी वश होईल की !... नाहीतर प्रेमाची भूक मालवणसारख्या गावात कुठली भागायला ?... तर, हा होता बापूचा अंतस्थ मनसुबा ! )

आणि मग एका सुमुहूर्तावर श्रीमंत काकाजी शिनारी आपल्या सुपुत्राला घेऊन जातीने मुंबईला जाऊन ठेपले. दादरवरच्या एका कॉलेजात त्यांनी त्याला प्रथम प्रवेश मिळवून दिला. एवढेच नव्हे, तर त्याला निवांतपणे अभ्यास करता यावा म्हणून जवळपासच्या एका चाळीत दुसऱ्या मजल्यावरची चांगली कोपऱ्याची एक खोली पागडी देऊन मिळवून दिली. टेबल-खुर्ची-खाट...सर्व काही दिमतीला दिले. हो ! त्याला कसलीही कमतरता पडायला नको !... शेवटी त्याचा निरोप घेताना ते म्हणाले—

"बापू, तुला कसलीही ददात पडणार नाही. महिन्याच्या महिन्याला मनीऑर्डर येत जाईल. एकटा राहणार म्हणून जीवाचे हाल करून घ्यायचं कारण नाही. मजेत राहा. पण अभ्यासाचं मात्र पहा. तेवढी बी. ए. ची पदवी घेऊन घराण्याचं नाव उजळ केलंस म्हणजे झालं ! बाकी आमचं काहीही म्हणणं नाही."

पिताजींच्या म्हणण्याला एकीकडे मान डोलावीत असताना सुपुत्राचे लक्ष, त्यांची गाडी कधी एकदा सुटते याकडे लागले होते. सिनेमाचे विचार त्याच्या डोक्यात घोळत होते.

—आणि पिताजींनी मुंबई सोडण्याचा अवकाश बापूने लगेच जवळचे थिएटर गाठले, आणि इंग्रजी सिनेमा पाहण्याचा पहिला मुहूर्त करून आपली फारा दिवसांची आकांक्षा पूर्ण केली.

त्यानंतर मग काय—प्रथम चारसहा दिवसांनी एखादा सिनेमा, असे करता करता हळूहळू एका दिवसाआड तरी एखादा चित्रपट पाहण्याचे सत्र त्याने सुरू केले. कॉलेजात रूळल्याबरोबर तर काही तासांना दांडी देऊनही नवे 'पिक्चर' गाठण्याचा सराव त्याच्या अंगवळणी पडला. कोणताही नवा हिंदी चित्रपट लागला, की त्याच्या पहिल्या 'शो' चे उद्घाटनच मुळी या शिनारी कुलदीपकाच्या उपस्थितीविना साजरे होईनासे झाले.

सिनेमाच्या या बेफाट वेडामुळे, आणि कॉलेजातील वगैरे पोरींवर छाप पाडण्यासाठी म्हणून, बापूच्या वेशातही नखशिखांत पालट घडून आला. पायात चप्पल, आणि वर साधी तुमान व बुशशर्ट तो मालवण ग्रामीही घालायचा. त्याच वेशात तो प्रथम मुंबईत अवतरला होता. पण लौकरच पायात टोकदार बूट, वर टेरिलीनची तंग सुरळी तुमान, टेरिलीनचा बुशशर्ट, आणि केसांचा झुलपेदार कोंबडा—असा मस्त नखरा सुरू झाला !... प्रत्यक्ष पिताजींनी

त्याला अलीकडे अचानक पाठमोरा पाहिला असता, तर त्यानासुद्धा त्याची चटकन् ओळख पटली नसती.

सिनेमाच्या भूताने तर बापूला एवढे झपाटले होते की– आवडत्या नटयांची त्याला वारंवार स्वप्नेही पडू लागली होती. त्याच्या खोलीतून अभ्यासाचे पडसाद शेजाऱ्यांना कुणाला क्वचितच ऐकू आले असतील, पण हिंदी सिनेमातील लोकप्रिय प्रेमगीतांच्या लकेरी मात्र त्यांच्या कानी वारंवार निनादत. ऐटबाज कपडे घालून केसांचा कोंबडा मिरवीत तो वारंवार आपल्या खिडकीत उभा राहायचा, व चौफेर नजर टाकीत, जवळपासच्या बिऱ्हाडांच्या खिडक्यातून पोरीबाळींना हेरीत असायचा.

अलीकडे तर, शेजारच्या चाळीतल्या समोरच्या खिडकीतून दिसणारा एका तरुण जोडप्याचा संसार हे त्याचे खास लक्ष्य बनले होते. आपल्या खिडकीतून तो संसार कुतूहलाने न्याहाळणे हा त्याचा विरंगुळ्याचा आणखी एक आवडता विषय होऊन बसला होता. खिडकीशी बसले, की समोरच्याच पहिल्या मजल्यावरच्या त्या बिऱ्हाडाच्या संसाराचा जवळजवळ सर्व चित्रपट त्याच्या डोळ्यांपुढे सरकत राहायचा. फावल्या वेळात, म्हणजे खोलीत असतानाच्या बहुधा सर्वच वेळात, आपल्या डोळ्यांचा कॅमेरा तो समोरच्या त्या उघडया खिडकीकडे वळवायचा, आणि आतले एकेक दृश्य रस घेऊन टिपीत बसायचा. सिनेमाचे विश्व एकूण काल्पनिकच. पण हे विश्व डोळ्यांपुढचे–प्रत्यक्षातले–जिवंत !...




खरे म्हणजे नवराबायकोचा एका खोलीतला संसार तो केवढा ? त्यातून नवरा–मधुकर दिवसभर आपल्या कचेरीत असायचा. घरात असायची ती बायको–कमल. पण तोच खरा बापूच्या जिव्हाळ्याचा विषय बनला होता. तिचा लोभसवाणा चेहरा, नाजुक शेलाटी अंगलट, नि एकंदर हालचाल बापूचे मन मोहून टाकी. त्याची आवडती नटी वहीदा रेहमान हिच्याशी कमलचे त्याला खूप साम्य दिसे. त्यामुळे तर तिचे आकर्षण त्याला विशेष वाटे.

मधुकर-कमलचा प्रेमविवाह झालेला होता याची कल्पना बापूला आली होती. पण त्याच्या मते मधुकर दिसायला फारसा बरा नव्हता. कमलला तर खासच शोभणारा नव्हता. आणि भरीला त्याच्या डोक्याला चक्क टक्कल पडत चाललेले. त्यामुळे बापूला तो जोडा विजोड वाटायचा. चुकून प्रेमविवाह झाला असला म्हणून काय झाले ? मधुकरवर कमलचे अलीकडे मनापासून प्रेम नसावे अशी बापूची भावना होत चालली होती. या समजुतीमुळे त्याला वाटे की, आपण तिच्याबद्दल सहानुभूति– आपुलकी दाखविली, तर तिलाही आपल्याबद्दल आकर्षण–प्रेमभाव वाटू लागेल. आणि म्हणून तिची दृष्टी वेधण्यासाठी तो आपल्यापरी धडपडे.

मधुकरला अलीकडे रेसचा नाद लागला होता. त्यावरून त्याचा कमलशी अधुनमधून तुरळक खटकाही उडे. मधुकरबद्दलच्या बापूच्या नाखुषीत या गोष्टीमुळे भर पडली होती; आणि कमलबद्दल त्याच्या हृदयाच्या एका कोपऱ्यात निर्माण झालेली हळुवार भावना वाढीस लागली होती. या भावनेपोटी तिच्या हालचाली तो तासचे तास अधाशीपणे न्याहाळीत बसे ! – कधी सहज दृष्टी गेल्यासारखे; तर कधी आपल्या खिडकीच्या दाराआडून चोरटेपणाने. आपल्याकडे तिची नजर जावी म्हणून तो आसुसलेला असे. हिन्दी सिनेमातील दर्दभरी प्रेमगीतांच्या लकेरीही तो अधुन मधून सोडायचा. पण अजून तिचा एखादा हसरा नेत्रकटाक्ष पैदा करण्यात त्याला यश मात्र आले नव्हते. किती झाले तरी ती विवाहित स्त्री. त्यामुळे मनात असले तरी आपल्या सूचक इशाऱ्यांना उघडपणे प्रतिसाद द्यायला ती बिचकत असावी असा निष्कर्ष बापूने काढला होता.

मधुकरला कचेरीत जेवणाचा डबा पाठवून झाला की, कमल स्वतःचे जेवण उरकायची; आणि आवराआवर करून खिडकीलगतच्या खाटेवर झोपायची. त्यावेळी तिला डोळे भरून पाहत बसण्यात बापू स्वतःचें समाधान करून घेई.

☆ ☆

त्या दिवशी दुपारी उकाडा फारच होत होता. कमलच्या खोलीच्या खिडकीवाटे वारा न येता उलट बाहेरच्या उन्हाच्या झळा अंगावर येत होत्या. वाऱ्याची दिशा होती दाराच्या बाजूने. उकाड्याने जीव खूपच हैराण होऊ लागला. म्हणून कमलने वाऱ्यासाठी दार अर्धवट उघडे ठेवून दिले; आणि ती नेहमीसारखी खाटेवर पडली. डोक्याखाली हात घेताना हातातल्या सोन्याच्या, टोकेरी तासाच्या बांगड्या बोचतात; म्हणून खाटेवर पडण्यापूर्वी त्या ती नेहमी कपाटात ठेवून द्यायची. पण आज

खाटेवर पडल्यावर त्या गोष्टीची तिला आठवण झाली. आज तिचा जीव खूप थकला होता, त्यामुळे मुद्दाम उठून बांगड्या नेऊन कपाटात ठेवायचे तिच्या जिवावर आले. म्हणून तिने त्या काढून पडल्यापडल्या उशाशी सरकवून ठेवल्या, आणि डोळे मिटून घेतले. दारातून येणाऱ्या वाऱ्याच्या झुळुकीनी उकाडा कमी झाला, आणि लौकरच ती गाढ झोपी गेली.

आरामशीर पहुडलेल्या कमलच्या सुस्त देहाकडे नेहमीप्रमाणे बापू आपल्या खिडकीतून अनिमिष नेत्रानी मजेत पाहत राहिला, तोच अनपेक्षित घटना घडली. कमलने अर्धवट उघडे ठेवलेले दार लोटून खुद्द मधुकर खोलीत शिरला. कमल झोपलेली आहे हे पाहून त्याने दार हळूच नीट आड केले, आणि चोरट्या पावलानी तो तिच्याकडे वळला— तिच्या चेहरा न्याहाळून पाहू लागला. मधुकरचा चेहरा बापूला गोंधळलेला दिसला. त्याच्या दृष्टीस आपण पडू नये म्हणून बापू जरा बाजूला सरकला. अवेळी घरी आलेला मधुकर काय करतो ते आपल्या खिडकीच्या दाराआडून बापू बारकाईने एकटक पाहू लागला.

कमल कितपत गाढ झोपलेली आहे याचा अंदाज घेण्यासाठी की काय मधुकरने आपले तोंड तिच्या अगदी तोंडाशी नेले. ते पाहून बापूची प्रथम कल्पना झाली— हा तिचे चुंबन घ्यायला जातोय् की काय ! पण नाही !... कमलच्या उशालगतच्या बांगड्यानी मधुकरची दृष्टी वेधली. बांगड्या पाहताक्षणी मधुकरचा चेहरा उजळून निघालेला बापूला दिसला. क्षणात काहीएक विचार ठरवून मधुकरने त्या बांगड्या अलगद् हस्तगत केल्या, व लगेच आपल्या खिशात कोंबल्या.

बापू धपापत्या उराने पहात होता— मधुकरची कावरी बावरी नजर पुन्हा एकदा कमलच्या चेहऱ्याकडे वळली. ती अजून गाढ झोपली होती. आता तिथे रेंगाळणे मधुकरला इष्ट वाटले नसावे. चोरट्या पावलानी पण लगबगीने तो गुपचूप खोली बाहेर पडला नि दार नीट लावून घेऊन गडबडीने बाहेर सटकला.

बापूला हा सारा प्रकार विचित्र वाटला. रहस्यमय चित्रपटातले एकेक प्रसंग आठवून त्याच्या कल्पनाशक्तीला धुमारे फुटले. परवा रात्री, रेसला पैसे हवेत म्हणून गहाण ठेवण्यासाठी मधुकरने कमलकडे तिच्या एक-दोन बांगड्यांची मागणी केली होती, तो प्रसंग बापूला आठवला. अंगावरचा दागिना देण्यास त्यावेळी तिने नकार दिला होता, हे बापूने त्यावेळी ऐकले होते. म्हणजे... मधुकर आता या बांगड्या नेऊन सराफकट्ट्यावर गहाण टाकणार आणि रेससाठी पैसे काढणार तर !... शंका मनात येताच बापूने आपली खोली चटकन् बंद केली, आणि मधुकरचा पाठलाग करण्यासाठी तो लगबगीने बाहेर पडला.

... पण, हाय रे दुर्दैवा !... बापू खाली पोचेपर्यंत मधुकर टॅक्सीत बसून दृष्टीआडही झालेला. बांगड्या गहाण टाकून ते पैसे घेऊन मधुकर आपल्या कचेरीला जाईल, असा तर्क करीत बापू असहाय्यपणे आपल्या खोलीवर परतला.

आता, निजून उठताच कमल बांगड्या नाहीशा झालेल्या पाहील, तेव्हा तिची काय स्थिती होईल कुणास ठाऊक !... या कल्पनेने बेचैन होऊन बापू खिडकीतून तिच्या निद्राधीन चेहऱ्याकडे स्निग्ध दृष्टीने पहात बसला...

...कमलला सहानुभूति दाखवून, तिच्यात व आपल्यात जवळीक निर्माण करण्याची संधी आता बापूपुढे चालून आली होती. ती कधी एकदा उठते आणि आपण एकंदर चोरी-प्रकरणाची इत्थंभूत हकीगत तिला सागतो अशा अधीरतेने बापू तिच्या उठण्याची वाट पहात राहिला. आपल्याशी प्रेमविवाह करणाऱ्या मधुकरने प्रत्यक्ष आपल्याशी प्रतारणा केल्याचे कमलला समजून चुकले, तेव्हा तिच्या मनातून मधुकर खात्रीने उतरेल ! – नव्हे ती त्याचा तिटकारा करू लागेल याबद्दल बापूला शंका उरली नाही.

—पण त्या दिवशी थकल्यामुळे कमल उठली ती चांगली चार वाजल्यानंतर. म्हणजे यावेळी तिची गाठ घेणे कठिण. कारण, यानंतर मधुकर कोणत्याही क्षणी येऊन टपकायचा. बापूचा नाइलाज झाला. करतो काय ? आता पुढील संधीची वाट पहायची !

उठल्याबरोबर कमलने प्रथम उशाशी पाहिले, तर बांगड्या गायब. ती अस्वस्थ झाली. आजुबाजूला – खाटेखाली सगळीकडे तिने धुंडाळ-धुंडाळ–धुंडाळले. पण बांगड्याचा पत्ता नव्हता, ती चरकली. झोपतेवेळी अर्धवट उघड्या ठेवलेल्या दारातून कुणीतरी हळूच आत शिरले असले पाहिजे, आणि त्याने बांगड्यांची गुपचूप चोरी केली असली पाहिजे खास !— गाढ झोपेमुळे आपल्याला बिलकुल दाद लागली नाही. जळ्ळी मेली ती झोप !

जाताना चोराने दार नीट लावून घेतलेले दिसत होते. दार उघडून कमलने खोलीबाहेर आजुबाजूला नजर टाकली. शेजारची सारी बिऱ्हाडे बंद होती. म्हणूनच चोराचे फावलेले दिसते !...



आता काय करावे ? मधुकर एवढ्यात येईल. त्याला कोणत्या तोंडाने हा प्रकार सांगयचा ? ती भारी बेचैन झाली. त्याच मनःस्थितीत ती कशीतरी रात्रीच्या स्वयंपाकाच्या तयारीला लागली.

लौकरच मधुकर घरी परतला. वापूची टेहळणी गुपचूप चालूच होती. त्याने पाहिले—मधुकर आपला चेहरा शक्य तितका निर्विकार भासविण्याचा प्रयत्न करीत होता. त्याने प्रथम दार बंद करून घेतले. मग त्याने कपडे काढून ठेवले. आणि-तो पाठ फिरवून, थकल्यासारखा डोळे मिटून खाटेवर पडला.

कमलने मधुकरला मुकाटपणे चहा करून दिला. खाटेवर उठून बसत त्याने निर्विकारपणे चहा घेतला. त्याच्या हातून चहाचा कप घेत मग तिने बिचकत बिचकतच बांगड्यांच्या चोरीचा प्रकार त्याच्या कानावर घातला.

बांगड्या चोरीला गेल्याचे ऐकताच मधुकरने रागाचे अवसान आणले आणि तिला सरळ धारेवर धरले. तो कुत्सितपणे म्हणाला—

"छान !... मी एकदोन बांगड्या जराशा गहाण ठेवण्यासाठी मागितल्या तर मला साफ नकार दिलास. काय तर म्हणे अंगावरचा दागिना गहाण टाकणं बरं नव्हे. आणि आता सर्व बांगड्या चक्क चोरीला गेल्या. अंगावर असताना चोरीला गेल्या नाहीत म्हणा ! काढून ठेवलेल्या गेल्या, एवढाच फरक !..."

"अहो, पण..." काकुळत्या वाणीने कमल म्हणाली, "रेससाठी पैसे काढायचे म्हणून बांगड्या गहाण ठेवायच्या होत्या तुम्हाला. म्हणून 'नाही' म्हटलं होतं मी !"

"म्हणून काय झालं ?" रागाचा पारा कायम ठेवीत मधुकरने आपली फैर पुढे चालविली, "पैसे हाती येताच गहाण ठेवलेल्या बांगड्या सोडवून परत तरी आणता आल्या असत्या. पण आता काय ? तुला नाही मला आणि मिळाल्या चोराला !.... अशी कशी कुंभकर्णी झोप तुझी ?— चोराच्या नशिबानं दार उघडं ठेवायची दुर्बुद्धी आठवली तुला. दुसरं काय ? बसा आता रडत !"

"अहो, आता झालं ते झालं. पण पोलिसात वर्दी तरी द्या लौकर. चोरी सांपडण्याचा तोच एक मार्ग."—कमल रंजीस येऊन म्हणाली.

"काही नको वर्दी द्यायला पोलिसात," मधुकर ती कल्पना झटकून टाकीत म्हणाला, "असल्या भुरट्या चोरीचा तपास तर नाहीच लागायचा. उलट, पोलीस येऊन बोभाटा होईल आणि लोकात अब्रू मात्र जाईल. त्यापेक्षा आपलंच नशीब खोटं म्हणून स्वस्थ बसणंच शहाणपणाचं !"

"अहो, पण. . . . "— रडकुंडीला आलेल्या कमलचा फिरून एकवार प्रयत्न.

"अहो पण नाही नि काही नाही. आता गप्प बसायला काय घेशील ?... आणि ती खिडकी जरा आड कर पाहू. उगाच बाहेर कुणाला तमाशा नको दिसायला !"

कमलने मुकाट्याने खिडकीची दारे आड केली.

मधुकरच्या साळसूदपणाचा— मानभावी बोलण्याचा बापूला मनस्वी संताप आला. कमलसारख्या भावड्या जीवाशी प्रतारणा करूनच्या करून वर तिच्या भावनांशी मधुकरने असा क्रूर खेळ खेळावा अं ?. . . खलपुरुष नायिकेशी वागावा तसा हा प्रकार बापूला वाटला. बापूचा जीव कमलसाठी–नायिकेसाठी तडफडू लागला. पण यावेळी तरी तो काहीही करू शकत नव्हता. घायकुतीने आततायीपणा केल्यास साराच बेत फिसकटायचा. असहाय्यपणे तो स्वस्थ बसून राहिला. खिडकी तर आता बंद झाली होती. बसल्या बसल्या त्याच्या मनात आले—

...एका दृष्टीने झाले तेच बरे झाले. दोघांचा खटका उडाला हे आपल्या दृष्टीनें इष्टच. स्वतः चोरी करून वर तो अशा प्रकारे कठोरपणे वागल्याचे तिला आपल्याकडून कळून चुकले, की तिचे चांगलेच डोळे उघडतील. त्याच्याबद्दलचा तिचा उरला-सुरला प्रेमभाव निर्माल्यवत् होईल. आणि–आणि नवऱ्याच्या प्रतारणेची रोखठोक साक्ष देणाऱ्या आपणाबद्दल तिला कोण आपुलकी वाटेल !.... एकदाची रात्र टळून जाऊ द्या. मग पहा म्हणावं !... मधुकरा, उद्या सकाळी तुझ्या ढोंगीपणाची शंभर वर्षे भरलीच म्हणून समज !....

इकडे कमलने खिडकीची दारे आड केल्याबरोबर मधुकरने कमलला झटकन् बाहुपाशात कवटाळले आणि तिचे चक्क चुंबन घेतले. कमल गोंधळूनच गेली. क्षणभरापूर्वी रागाने फडाफड बोलून आपली निर्भत्सना करणारा मधुकर एकाएकी असे काय करतो म्हणून ती थक्क होऊन पहातच राहिली. पण मधुकरने तिला फार वेळ बुचकळ्यात ठेवली नाही. तिला खाटेवर आपल्या शेजारी बसवीत त्याने हसत हसत सारा खरा प्रकार सांगून टाकला.

"दुपारी मी ऑफिसच्या कामानिमित्त या भागात आलो होतो. म्हटलं— घरी चटकन् चहा घेऊन परत जावं. म्हणून सहज आलो, तर खोलीचं दार उघडं. आणि उशाशी बांगड्या ठेवून तू गाढ झोप-लेलीस. त्या बांगड्या पाहून तुझी गंमत करायची कल्पना मला सुचली."

"म्हणजे ?" अचंब्याने कमल उद्गारली.

"म्हणजे काय ते दाखवतोच तुला—" असे म्हणत मधुकर उठला, आणि कोटाच्या खिशातून बांगड्या आणून त्या त्याने स्वतः तिच्या हातात घातल्या.

"भारीच बाई तुम्ही !" कमल हसून उद्गारली, "अशी जीवघेणी थट्टा सुचते तरी कशी तुम्हाला ? घरचा चोर नि नस्ता घोर !"

–पण पुन्हा एकदा तिच्या ओठांवर आपले ओठ टेकीत त्याने तिचे तोंड बंद केले.

आता मात्र "इश्श !.. हे काय ? स्वयंपाक करायचा तसाच पडलाय् !" म्हणत कमल दूर झाली.

"चोर तो चोर आणि वर शिरजोर ठरल्याचं तुमचं हे नामी उदाहरण आहे, बरं का !" शेगडीवर भाजीला फोडणी देत कमल हसत पुटपुटली.

"होयच मुळी !". . . .खाटेवर अंग झोकून देत मधुकर फिस-फिसला.

"बऽरं !... तमाशा संपला ! आता खिडकी उघडा ती. उका-ड्यानं जीव नकोसा झालाय् !"– कमल.

खिडकी उघडली, तेव्हा रस घेण्यासारखे काही उरलेले बापूला दिसले नाही. तो खाणावळीत जेवायला निघून गेला.

☆☆

दुसरा दिवस उजाडला. आता कमलला कधी एकदा एकटी गाठतो असे बापूला झाले. बांगड्यांच्या चोरीची वस्तुस्थिती कथन करणारी चिठ्ठी त्याने रात्री लिहून ठेवली होती. रोज सकाळी मधुकर मजल्याच्या टोकावरच्या सामायिक बाथरूममध्ये आंघोळीला जायचा हे बापूला ठाऊक होते. आज सकाळी तो आंघोळीला जाईल, तेव्हा ती संधी साधायची आणि कमलला एकटी गाठून तिच्या हाती ती चिठ्ठी देऊन लगेच परतायचे, असा मनसुबा बापूने रचला होता.

सारी रात्र बापूला चैन नव्हते. स्वस्थपणाने धड झोप लागेल तर शपथ ! जरासा कुठे डोळा लागला, तर तेवढ्यात स्वप्न पडले ते कमलचेच...

...तिला एकटीला गाठून बापू चोरीचा खरा प्रकार सांगतो. ती थक्क होते. मग आश्चर्याचा भर ओसरताच ती बापूकडे मोठ्या प्रेमळ नजरेने पाहते. म्हणते— 'आपुलकीनं माझ्यासाठी एवढी तसदी घेतलीत–तुमचे आभार कसे मानू तेच समजेनासं झालंय् !' तो म्हणतो— 'आभार कसले मानायचे त्यात ? योग्य वाटलं ते केलं–कर्तव्य बजावल्याचं समाधान !' यावर ती म्हणते– 'अहो, कोण कुणासाठी एवढं आस्थेनं करायला बसलंय् ?... तुम्ही म्हणून...बरं झालं या निमित्तानं तुमच्यासारख्याचा परिचय झाला. भेटत जा असेच अधुन मधून — आनंद वाटेल मला !...'– आणि ती बापूकडे अशा काही हसऱ्या, लोभस नजरेने पाहते की– त्याचा कलिजा

### स्त्रिया व क्रिकेट :

**आपल्या जवळचे उदाहरण म्हणजे पाकिस्तानचा सलामीचा फलंदाज 'नाझर महंमद.' दुसरा मुश्ताकअली असा त्याचा लौकिक. पण स्वारी एका नटीच्या प्रेमाच्या लफड्यात सांपडली. ती नटी विवाहित होती. शेवट नेहमीप्रमाणे झाला. नवरोजीना संशय आला. व एका प्रसंगी तो अचानक घरी आल्यावर त्या आणीबाणीच्या प्रसंगी हा प्रेमवीर खिडकीतून उडी टाकता झाला. व त्याचा पाय मोडून तो कायमचा लंगडा होऊन बसला. तुकारामाच्या उक्तीप्रमाणे 'गाढव व ब्रह्मचर्य' म्हणजे त्याच्या बाबतीत 'क्रिकेट व प्रेयसी' दोन्ही गमावून बसण्याची आपत्ति बिचाऱ्यावर ओढवली !**

अनुक्रमणिका

पार खलास होतो !.... तेवढ्यात कुणाची तरी चाहूल ऐकू येते. मधुकर आला असेल या कल्पनेने बापू लगेच तिथून सटकतो.

–त्या स्वप्नाची धुंदी बापूच्या मनावर अजून रेंगाळत होती. मधुकर आंघोळीला कधी जातो इकडे त्याचे डोळे लागून राहिले होते.

त्याने झक्कपैकी कपडे चढवले होते, तोंडाला स्नो–पावडर चोपडली होती, आणि केसांचा मस्त कोंबडा उभारून तो जय्यत तयार राहिला होता.

रात्री लिहून ठेवलेल्या त्या चिठ्ठीने कमलबरोबरच्या आपल्या प्रेमाचा पायाच घातला जाईल असा विश्वास बापूला वाटत होता. रात्रीच्या स्वप्नाने त्याच्या या विश्वासाला दुजोरा मिळालेला होता. म्हणून तो खुषीने फुलून गेला होता. त्या चिठ्ठीवरून त्याने पुन्हा एकदा नजर फिरविली.

"......खुद्द मधुकररावानीच तुमच्या बांगड्यांची चोरी भर दुपारी गुपचूप केली आहे हे कळून तुम्हाला आश्चर्याचा तापदायक धक्का बसेल. पण हे खरे आहे. कारण, माझ्या डोळ्यानी मी ते प्रत्यक्ष पाहिले आहे.......माझा असा ठाम तर्क आहे की——त्यानी त्या बांगड्या गहाण टाकल्या असतील, आणि रेससाठी हवे होते ते पैसे काढले असतील! ....तेव्हा त्यांच्या नस्त्या कांगाव्याने फसण्याचे कारण नाही. उलट चोरीचे घोंगडे त्यांच्याच गळ्यात पडणारे आहे. आणि वर तुमची फसवणूक! तुमच्यासारख्या शालीन प्रेमळ स्त्रीशी तरी त्यानी अशी प्रतारणा करायला नको होती. .....पण काही हरकत नाही. मी तुमच्या पाठीशी आहे याची खात्री बाळगा. या साऱ्या प्रकरणाचा छडा लावण्याच्या कामी तुम्ही म्हणाल तेव्हा मी तुमच्या सेवेस सिद्ध आहे. मधुकररावाना यातलं काहीही अर्थातच नाकारता येणार नाही! ....तुमच्याबद्दलच्या सहानुभूतीच्या पोटी ही एवढी धडपड करायला मी प्रवृत्त झालो आहे. तिचं योग्य ते चीज करणं अर्थातच तुमच्या हाती आहे. जास्त काय लिहू? तुमच्या हाकेला 'ओ' देण्यास सदैव तत्पर असलेला —

तुमचा हितचिंतक,
**बापू शिनारी."**

—आणि ठरल्या वेळी मधुकर आंघोळीला निघून गेला. त्याबरोबर बापूची स्वारी ती चिठ्ठी घेऊन लगोलग तातडीने आपल्या कामगिरीवर निघाली. खोलीचे दार उघडेच होते. कमल चहाचे आधण ठेवीत होती. धपापत्या उराने बापू आत शिरला आणि त्याने चांचरत हाक मारली—'क–म–ला–बा–ई!'

कमलने त्याच्याकडे वळून विचारले–"काय आहे?"

थरथरत्या हाताने चिठ्ठी कमलच्या हाती देत बापू पुटपुटला, "ही चिठ्ठी लगेच वाचा, अत्यंत महत्त्वाची आहे."

—आणि बापूची स्वारी मागल्या पावली तिथून सटकली सुद्धा.

कमलला या प्रकाराचा प्रथम बोधच होईना. क्षणभर ती विचारात पडली. पण चिठ्ठी महत्त्वाची नि लगेच वाचायची होती. म्हणून तिने वाचायला सुरुवात केली.

# फायर वन.....गाझी हादरली !
# फायर टू....ती भेदरली !!
# फायर थ्री.....पाण्याखाली दडली !!!

सप्टेंबर १९६५ मध्ये 'गाझी' या पाकिस्तानी पाणबुडीला भारतीय नौदलाने एकाच दणक्यात निकामी केले. त्यामागील खडतर तपश्चर्या कशी करावी लागते ? रिअर ॲडमिरल **नंदा** (ध्वजाधिकारी–नौदल), रि. ॲड. **डेव्हिड**, कमोडोर **मेहरा**, कमांडर **अंड्र्यूज** आदिंच्याच तोंडून ऐका....'हाय–टी' म्हणजे ? उंची चहा की उंच चहा ? छट्....! लंच म्हणजे डिनर....डिनर म्हणजे सपर....? लेफ्ट. कमांडर **जॉर्ज** यानाच विचारावयास हवे.

*'घर धनी गेला दरियापार ऽ ऽ ऽ*

# दीपावली



## प्रजासत्ताक-दिनानिमित्त

## नौदल–दर्शन विशेषांक

पृष्ठे ८० वर रु. १–५०

रिअर–ॲडमिरल **करमरकर** (निवृत्त)

**यानी टिपलेले दुसऱ्या महायुद्धातील नाविक लढाईचे चित्तथरारक वर्णन.**

शिवाय तरंगती बिंग चित्रे, हास्य–काव्ये इ. इ.

एजंटानी आपली मागणी २० जानेवारी १९६७ च्या आत नोदवावी.

—आणि चिठ्ठी वाचून ती गारच झाली. 'काय तरी पोर आहे!' असे उद्‌गारत ती चिठ्ठीची घडी करू लागली. तोच मधुकर आंघोळीहून परतला.

"काय ग, कुणाचं पत्र?"

"हे घ्या. वाचा तुम्हीच—मग येईल लक्षात सारं! ....."

तिच्या हातची चिठ्ठी घेऊन मधुकर वाच लागला. वाचता वाचता तो अस्वस्थ झाला—

"अरेच्या! कोण ग हा?"

"अहो, तो समोरचा टोळभैरव!" बापूच्या खोलीकडे बोट दाखवीत कमल म्हणाली, "कॉलेजात जातो वाटतं. स्वतःच ही चिठ्ठी घेऊन आला होता आताच. काय तरी एकेक पोरं ?"

"अस्सं! या पोराना नस्ते उपद्व्याप करण्यावांचून दुसरे उद्योगच नसतात की काय? ते काही नाही. याला चांगलाच धडा शिकवायला हवा. दिसतो का बघ खोलीवर?"

बापूसाहेब खिडकीशी उभे राहून इकडे तिकडे पाहण्याची बतावणी करीत, नवरा—बायकोच्या भांडणाला कसा काय रंग भरतो हे टेहळत होते.

"हो. खिडकीतच उभी आहे स्वारी?"

"असं? हाक मार त्याला. लगेच ये म्हणावं!" ऑफिसचे कपडे चढवीत मधुकर फणाणला!

"अहो शिनारी, जरा इकडे येऊन जा—आताच". कमलने हाक मारली.

बापूचे कान तिकडेच लागले होते. कमलची हाक येताच तो खुष झाला. 'हं. हा आलो, म्हणत तो तसाच निघाला. पण हाक मारणाऱ्या कमलकडे तो क्षणभर आशेने पाहतो तो तिच्या बाजूला




मधुकर उभा. म्हणजे? कमल एकटी नाही तर? मग?—रुजवात करायला का बोलवलंय् आपणाला?... रुजवात करायची तयारी त्याने चिठ्ठीत दर्शविली असली तरी तशी पाळी येईल अशी त्याची कल्पना नव्हती. बापू मनातून चरकला. गोंधळला—गड-बडला. पण आता यातून पळवाट नव्हती. खोली बंद करून तो मुकाटयाने तिकडे गेला.

रुजवातीसाठी मनाची तयारी करून बापूने त्यांच्या खोलीत विचकतच पाऊल टाकले. आणि काय? तिथला रागरंग पाहून तो पार थिजला. कमल कुत्सितपणाने त्याच्याकडे पाहू लागलेली; तर मधुकरच्या रागाचा पारा चढलेला!

"काय रे, बापू शिनारीच ना तू ? ही चिठ्ठी तूच आणून दिलीस? बोल—"

—मधुकरने प्रथमच असे धारेवर धरताच बापू गांगरला. त्याची बोबडीच वळली. कारण दोस्तपक्षीय मानलेली कमल धडधडीत शत्रुपक्षाला मिळालेली दिसत होती. बापू हतबुद्ध झाला. चांचरत चांचरत तो कसाबसा पुटपुटला—"अं?....अं....हो—होय!"

"अक्कल जादा होऊन पाघळायला लागलीय् वाटतं?" मधुकरने फैर सुद्धा केली "पिसाचा पारवा करण्याला कुठं शिक-लास? काहीतरी अर्धवट पाहून नस्तं तर्कट लढवायला आमचा संसार म्हणजे सिनेमाचा खेळ वाटला होय रे तुला? कॉलेजात जाऊन हेच शिकतोस वाटतं?"

हूं—की—चूं न करता, मान खाली घालून बापू मुकाट उभा होता. मधुकरच्या तर सोडाच, पण कमलच्या तोंडाकडेही परत पाहण्याचा धीर त्याला झाला नाही.

कमलचा हात उंच धरून दाखवीत, मधुकर खवचटपणे म्हणाला—"पाहिल्यास या बांगड्या? पहा. नीट डोळे फाडून पहा. साऱ्या चांगल्या सुखरूप आहेत."

बांगड्या पाहण्यापुरती बापूने आपली नजर जराशी वर उचलली. आणि त्या पाहिल्यावरोबर नांगी टाकल्यासारखी हताश-पणे ती पुन्हा खाली वळविली.

"मी काय व्हिलन वाटलो तुला? आणि स्वतःला हिरो समज-तोस काय?" मधुकरच्या जिभेचा पट्टा बापूवर सरासर वार करू लागला, "हूं! ....तुम्ही अलीकडची पोरं म्हणजे सिनेमाच्या वेडानं नादान बनू लागला आहात. अभ्यासाचं काय हवं ते वाटोळं करा म्हणा—आम्हाला त्याच्याशी काही कर्तव्य नाही. तुमचे पिताजी पाहून घेतील. पण त्यानी तुम्हाला पोळासारखं वाऱ्यावर सोडलं असलं, तरी आमच्या संसारात उगाच आपलं शेंबडं नाक खुपसत राहाल तर याद राखा. नस्ता चोंबडेपणा करायचे हे उद्योग बंद करा. याउप्पर आमच्याकडे ढुंकून पाहाल, तर माझ्याशी गांठ आहे. सांगून ठेवतो. पोलिसात माझी चांगली ओळख आहे. असा तांगडवीन की जन्माची याद राहील! ...आणि काय हो चोंबडेबुवा—हो, अभ्यासात पदवी नाही मिळाली तरी 'चोंबडेबुवा' ही पदवी नामी शोभते तुम्हाला. हूं! ..तर...काय

हो चोंबडेबुवा, हिच्याबद्दल तुम्हाला एवढी सहानुभूती अं?..भारीच स्त्रीदाक्षिण्य दिसतं तुमचं. पण हिच्या काळजीचा भार अम्यासाच्या भरीला वाहायचं तुम्हाला मुळीसुद्धा कारण नाही."

"हो!" नवऱ्याला साथ देत कमल कुत्सितपणे म्हणाली, "आणि माझ्या पाठीशी राहण्याची तसदीपण घेऊ नका, बरं का! हे समर्थ आहेत."

हाय रे दुर्दैवा!...जिला आपण शालीन समजलो–जिच्या लोभापायी एवढा अट्टाहास केला, त्या प्रत्यक्ष कमलनेही कुत्सितपणे आपल्याला असे सुनवावे अं!...आता मात्र बापू पार खचला. कधी एकदा या खाष्ट जोडप्याच्या कचाट्यातून सुटतो, आणि ढुंगणाला पाय लावून सटकतो असे त्याला झाले. एकंदर आकस्मिक हल्ल्याने तो, चक्रव्यूहात सांपडल्यासारखा भेदरून गेला. त्याच्या अंगाला दरदरून घाम फुटला. त्यामुळे त्याचा टेरिलीनचा बुशशर्ट घामाने थबथबला, आणि कपाळावरून ओघळणाऱ्या घामाच्या धारानी त्याच्या चेहऱ्यावरच्या स्नो–पावडरच्या गिलाव्याची अगदी रया केली. शरमेने आधीच ओशाळलेल्या चेहऱ्याला विद्रुप अवकळा आली बापूची ती एकंदर दशा पाहून मधुकरला त्याची कीव आली. वाग्बाणांचा भडिमार आवरता घेत तो म्हणाला——

"हं! जा आता तोंड काळं करा! पुन्हा कधी आम्हाला दाखवायची तसदी घेऊ नका!"

—आणि खरोखरीच काळवंडलेले आपले तोंड खालच्या मानेने लपवीत, मोहरा फिरवून शिनाऱ्यांचा कुलदीपक —बापू मुकाट्याने दाराबाहेर पडला. आणि मग त्याने जो सूं बाल्या केला तो थेट आपली खोली गाठेपर्यंत. खोलीत शिरताच त्याने दार आतून धाडकन् बंद करून घेतले, अंगावरच्या बूट–कपड्यांसह सरळ खाटेवर उपडी लोळण घेतली, आणि उशीत तोंड खुपसले.

त्या दिवशी सायंकाळी बापू खोलीवर परतला तो खिडकीचा पडदा बरोबर घेऊनच लगेच त्याने खिडकीला लावूनही टाकला. पडदा लावीपर्यंत समोरच्या खिडकीकडे पाहण्याचा धीर काही त्याला झाला नाही. पण नंतर पडद्याच्या बाजूच्या फटीतून त्याची सराईत नजर हळूच चोरटेपणाने तिकडे वळलीच—तर काय? —त्याही खिडकीला पडदा लटकावलेला! ●●●

# अशी पाखरे येती....

"आणिक स्मृति ठेवुनी जाती" असं एका कवीने आपल्या एका भावगीतात म्हटलं आहे. त्या कवितेतल्या त्या शब्दांचा संदर्भ कदाचित् वेगळाही असू शकेल. पण मला मात्र आज त्या ओळी आठवताहेत त्या माझे एक मित्र-सुहृद्, नासिकचे एक तरुण चित्रकार श्री. सोमनाथ गांधी यांच्या अकाली निधनाने! काही काही माणसे प्रत्यक्षात एकदाही न भेटता, न बोलता एकदम जीवनभर पुरणारी स्मृति (आणि मग हुरहूर) देऊन जातात ह्या गोष्टीवर आपण विश्वास ठेवाल? चित्रातले रंग बोलतात, रेषा हितगुज करतात. आकृति स्नेहबंध उत्पन्न करू शकतात. त्यातून अतूट असे नाते निर्माण होऊ शकते ह्यावर एरव्ही मीच काय, पण कुणीही विश्वास ठेवला नसता. पण कां कुणास ठाऊक (अजूनही मला ते कोडे उलगडलेले नाही) सोमनाथ गांधी ह्यानी माझ्या मनात काही स्मृति कोरून ठेवल्या आहेत हे मात्र खरे! वास्तविक त्यांची माझी प्रत्यक्ष गाठभेट झाली नाही. त्यानी त्यादृष्टीने खूपदा प्रयत्न केला. मीही त्याना प्रतिसाद देण्याचा प्रयत्न केला. पण अखेरपर्यंत आम्ही एकमेकांसमोर कधी आलोच नाही. एकमेकांशी प्रत्यक्ष कधी बोललोच नाही. आम्ही बोलू लागलो पत्राची भाषा. ते मला पत्रातून 'गुरुवर्य' म्हणून संबोधू लागले तेव्हा मला संकोचच वाटला. पण त्यानी ते मनोमन मानले होते. तो दंभ नव्हता. त्यात खोटेपण नव्हते. मी त्याना नेमके काय दिले? काय शिकविले? ह्याचा मी विचार करतो तेव्हा मला वाटते की, मी त्याना फक्त दिलासा 'दिला असावा'. त्यांच्या श्रद्धेला तडा बसावा असे मात्र मी वागलो नाही. कारण येणारी सारी पत्रे उत्कटतेने भरलेली असत. त्याने मला एक आगळा, उत्कट अनुभव दिला. पण प्रत्यक्ष मात्र आम्ही एकमेकाना काही– काही दिलं नाही! तसा योग नव्हता असंच आता म्हटलं पाहिजे. माझ्या आयुष्यात हा तरुण, होतकरू, उमेदीचा कलाकार आला. आणि ऐन तारुण्यातच हृदयाच्या विकाराने दीर्घकाळ आजार काढून देवाघरी गेला. त्यांची पत्रे येत. आनंद देऊन जात. आणि मग एक दिवस अचानक त्यांच्या एका मित्राचे पत्र आले– सारे काही संपले होते. ती उत्कटपत्रे, ते स्वयंस्फूर्तीने मानलेले शिष्यत्व, तो दिलासा —– त्या भेटीची स्वप्ने– खूपसं काही शिकण्याची स्वप्ने, नव्या आशा-नव्या उमेदी—सारं! सारं काही!!

२ जुलै १९६६ ला 'गुरुपौर्णिमे'च्या निमित्ताने त्यानी मला एक पत्र लिहिले आहे. "आपणास भेटण्याची, आपल्या कार्यालयातील निर्मितीचे धुंद वातावरण एकदा तरी डोळे भरून पाहण्याची कधीची इच्छा अजून अपुरीच आहे." ....आज आहे गुरुपौर्णिमा. आपल्या कार्यातून प्रेरणा घेऊन ६–७ वर्षापूर्वी अशाच अवघड स्थितीतून उभा राहिलो. आपल्यावर श्रद्धा होती... इतर काही श्रद्धाना धक्का बसला आहे. पण आपल्यावरील, आपल्या अखंड निर्मितीकार्यावरील श्रद्धा अजून अभंग आहे. हेही दिवस संपतील. पुन्हा आपल्याच प्रेरणेने उभा राहीन अशी उमेद आहे....

पण दिवस संपले. रात्री सरल्या. सारेच संपले. सोमनाथ गांधी ह्या नावाने कलेचा ध्यास घेणारा आत्मा आता अनंतत्वात विलीन झाला आहे. काळाने त्या कोवळ्या पाखराचे पंख छाटून टाकले आहेत.

माझ्याजवळून त्याने नेमके काय घेतले ते अजून मला एक कोडे आहे. मला मात्र ते देऊन गेले आहेत– स्मृतीचा एक अखंड वारसा!

सोमनाथ गांधींच्या असंतुष्ट आत्म्याला शांति मिळेल की नाही ठाऊक नाही. पण ती मिळावी अशी मात्र मी प्रार्थना करतो!

—दीनानाथ दलाल

प्रा. मधुकर वासुदेव धोंड

# बालकवि आणि रमाई

**अकाली प्रतिभा आटली तर कोमल मनाचा कवि कसा तडफडतो याचा प्रत्यक्ष अनुभव बालकवीना आला होता–तो केव्हा व कसा याचा अत्यंत चिकित्सापूर्वक ऊहापोह करून पुराव्यानिशी प्रा. धोंड यानी टाकलेला प्रकाशझोत.**

**'अभीरुची'च्या** सप्टेंबर १९६६च्या अंकातील 'बालकवि आणि रमाई' या लेखात, "बालकवींचे 'रमाई'बद्दलचे आकर्षण १९१७–१८ या काळापुरतेच मर्यादित होते. या काळात बालकवीनी **संतांचा अनुवाद** आणि **रजनीस आवाहन** या दोनच कविता लिहिल्या हे लक्षात घेतले की **संतांचा अनुवाद** ही कविता सोडल्यास बालकवींच्या काव्याशी 'रमाई'चा तसा काही संबंध नाही हे कळून येते," असे विधान मी केले होते. हे विधान तपासून पाहणे आता आवश्यक वाटते.

उपरिनिर्दिष्ट दोन्ही कविता बालकवींच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसात प्रसिद्ध झालेल्या 'मनोरंजना'च्या मे १९१८ च्या अंकात प्रकाशित झाल्या. त्यातील दुसऱ्या कवितेचे नाव **रजनीस आवाहन** असे नसून **आवाहन** एवढेच आहे. बालकवींच्या कवितांच्या संग्रहातही ती याच नावाने आलेली आहे. यात केवळ रजनीस आवाहन आहे. **संतांचा अनुवाद** मध्ये जसा 'रमाई'चा स्पष्ट उल्लेख आहे तसा यात नाही; सूचित निर्देशही नाही. तरी बालकवीनी 'रमाई'ला दाखविण्याकरिता जी कविता सोनाळकरांकडे १–११–१९१७ च्या पत्रासोबत पाठविली होती ती हीच असावी असे वाटते, कारण "त्यात 'रजनी मातेचे आवाहन' केले आहे," असे बालकवीच त्या कवितेसंबंधी आपल्या पत्रात लिहितात आणि २.२.१९१८ ला **संतांचा अनुवाद** ही कविता 'मनोरंजन'कडे प्रसिद्धीस पाठविल्यानंतर चारच दिवसानी **आवाहन** ही दुसरी कविता आली, असे संपादक त्या अंकातच म्हणतात. यावरून १.११.१९१७ ला 'रमाई'ला दाखविण्याकरिता सोनाळकरांकडे ही कविता पाठविल्यानंतर तीन महिन्यानी तशीच वा काही संस्कार करून ती 'मनोरंजन'कडे प्रसिद्धीस पाठविली असावी, असा तर्क करण्यास हरकत नाही.

'व्हीनस प्रकाशना'ने अलीकडेच प्रसिद्ध केलेल्या **समग्र बालकवी** या ग्रंथात आजवर कोणत्याही संग्रहात समाविष्ट न झालेली **तुझे न दर्शन घडले अजुनी** ही कविता आलेली आहे. ही कविता 'रमाई'ला उद्देशून असावी आणि त्यावरून बालकवी-रमाई संबंध जास्त स्पष्ट होतो, असे वाटते. या कवितेच्या प्रसिद्धीचा इतिहास लक्षात घेण्याजोगा आहे.

ही कविता 'सह्याद्री'च्या डिसेंबर १९४४ च्या अंकात प्रथम प्रसिद्ध झाली. ती सुप्रसिद्ध कवी बा. सी. मर्ढेकर यानी प्रसिद्धीला पाठविली होती. कवितेच्या खाली पुढील टीप आहे—

"वीस वर्षांपूर्वीची गोष्ट. १९२४ मध्ये बालकवी त्र्यं. बा. ठोमरे यांच्या कवितांचे आणि चरित्राचे संशोधन करण्यास आरंभ केला होता. थोडेसे बाडही जमविले. पण त्या प्रयत्नाला दृश्य असे फळ अनेक कारणानी येऊ शकले नाही. तो इतिहास आता आत्म-चरित्राचा भाग आहे !

"त्यावेळी जमविलेल्या कागदांपैकी काही कागद चाळीत असता पुढील कविता आढळली. ही कविता मी कोठे, कशी उतरवून घेतली ते आता आठवत नाही. ती कोठून मला मिळाली हेही मी विसरलो आहे. कवितेला नाव नाही. कविता बालकवींची आहे, ह्याबद्दल अर्थात शंका घेण्याचे कारण नाही. कवितेच्या धाटणी-वरून आणि माझ्याजवळच्या ज्या कागदात ती सापडली त्यावरून रचनाकार कोण याबद्दल वाद नसावा.

"प्रा. भा. ल. पाटणकर यानी संपादिलेल्या **'बालकवींची समग्र कविता'** (१९४२) या संग्रहात ही कविता आढळत नाही. ती पुन: कोठे तरी हरवेल म्हणून 'सह्याद्री'कडे पाठवीत आहे. पुढील लिखित हे प्रथम-लिखितच असावे, कारण ते जसे स्फुरले तसे लिहिलेले दिसत आहे. त्यावरून हात फिरलेला नाही. बालकवींच्या कविता कशा लिहिल्या जात, याचा साधारण अंदाज त्यावरून बांधता येईल. बालकवींचा चरित्राशी या कवितेचा संबंध आहे का नाही, याबद्दल पुढे केव्हा तरी लिहीन."

**कविता पुढीलप्रमाणे आहे–**

तुझें न घडलें दर्शन अजुनी प्रिय जननी या तव बाला
वाणि न कानीं हाय ! ऐकिली शांतवील जी हृदयाला
शांतवील जी मम हृदयाला संदेहाला घालविल

दग्ध मनाची वेल आपुल्या प्रेमस्पर्शे पालविल
प्रेमळ जननी जीव गोठतो तगमग दाटे हृदयांत
(क्षणक्षणा) हुरहुरुनी जीवही कंठामधि दाटुनि येत
मनोवृत्तींना फुलवील माझ्या काव्यवसंता बोलविल
———— गूढ गायने गाउनि विश्वा हालविल
सभोवार चांदणें पसरलें हें शरदाचें गोड किती
झाड झुलेना, पान हलेना, विश्वचि हो की स्तिमित अती
प्रसन्नता जणु अगाध सरिता भरिती अपुली चंद्रकरीं
रजनीदेवी गूढ शांततामंत्र पसरिती त्याहिवरी
हृदयस्पर्शी अंगाईचें प्रेममाउली गीत म्हणे
त्याच्या तारा हलुनि राहिल्या चंद्रकरीं जणु मूकपणें
अनंत चिंता अनंत दुःखें वाण तयाला नसे मुळी
चंद्रकरापरि प्रभो अनंता प्रीति तरी तव वाढतसे
दमलीं श्रमलीं मानवबाळें त्यांस विसावा हवा जरी
नसेल जगतीं नसो, असे परि शांतिसागरा तुझ्या घरीं
सृष्टि तुझी ही — हेंच तुझें घर — विहार ———
निळया नभावर संगमरवरी गिरिशिखरापरि मेघ दिसे ✽
शुभ्र धरेवर नीलघनापरि सुंदर छाया शोभतसे
जगत्पावनी ही जगदात्म्याची करुणा गगनीं विरघळुनी—

(या कवितेतील पंधराव्या पंक्तीतील 'नसे मुळी' ही पदे 'मुळी नसे' अशी फिरवून घेतली की त्या पंक्तीचे सोळाव्या पंक्तीशी अन्त्य यमक सहज जुळते, यावरून हा कदाचित् मुद्रणदोष असावा असे वाटते.)

श्री. कृ. बा. मराठे यानी 'छंद'च्या सहाव्या वर्षाच्या पहिल्या अंकात 'बालकवींच्या असंकलित कविता' या शीर्षकाखाली सहा कविता प्रसिद्ध केल्या आहेत, त्यात हीही कविता आहे. ती त्यानी 'सह्याद्री'च्या अंकातूनच उद्धृत केली आहे. परंतु त्यात त्यानी (१) मुळातील चौथी पंक्ती गाळलेली आहे, (२) मुळातील सहाव्या पंक्तीतील 'क्षणक्षणा' या शब्दाचा कंस काढून टाकलेला आहे, (३) मुळातील आठव्या व एकोणीसाव्या पंक्तीतील आडव्या रेघांच्या ठिकाणी पदरचे शब्द कंसात घातले असून तसा खुलासा काही केलेला नाही आणि (४) मुळातील 'मेघ दिसे' वरील नक्षत्र व त्याखालील "'मेघोदरी' खोडून 'मेघ दिसे' लिहिले आहे," ही टीप गाळलेली आहे.

नुकत्याच प्रकाशित झालेल्या '**समग्र बालकवी**' या ग्रंथात संपादकानी ही कविता समाविष्ट केली आहे. पण त्यानी ती 'सह्याद्री'च्या अंकावरून घेतलेली नसून 'छंद'मधूनच घेतलेली दिसते, कारण वर उल्लेखिलेले सर्व प्रमाद त्यातही जसेच्या तसे दिसून येतात. 'महाराष्ट्रातील एका ख्यातनाम व साक्षेपी विद्वान मित्राने सर्व मुद्रणदोषांची नोंद करून शुद्धिपत्र तयार करण्यास मदत केली,' अशी या ग्रंथाचे संपादक ग्वाही देतात, पण शुद्धिपत्रात या दोषांची नोंद दिसत नाही, यावरून या विद्वानांचा साक्षेपही या बाबतीत अपुरा पडलेला दिसून येतो. कवीची कविता ग्रंथनिविष्ट करताना मूळ संहितेबद्दल दिसून येणारी ही अनास्था चिंता उत्पन्न करणारी आहे. "प्रस्तुत कवितेचे लिखित हे प्रथमलिखितच असावे, कारण ते जसे स्फुरले तसे लिहिलेले दिसत आहे. त्यावरून हात फिरलेला नाही. बालकवींच्या कविता कशा लिहिल्या जात, याचा साधारण अंदाज त्यावरून बांधता येईल," हा मर्ढेकरांचा हे काव्य प्रसिद्ध करण्याचा एक हेतू वरील संपादकानी आपल्या निष्काळजीपणाने व अनधिकृत फेरफारानी विफल करण्याचा चंग बांधलेला दिसतो.

✩ 'मेघोदरी' खोडून 'मेघ दिसे' लिहिले आहे.

'बालकवींच्या कविता कशा लिहिल्या जात याचा साधारण अंदाज बांधता येईल,' असे मर्ढेकर म्हणतात ते याच एका कवितेवरून. पण माझ्या मते [१] **तुझे न दर्शन घडले अजुनी** (२०५), [२] **रजनीस आवाहन** (१९३–१९४), [३] **रजनीस (आवाहन)** (१९९) आणि [४] **आवाहन** (१०८–१०९)✽ या चार कवितांच्या या क्रमाने विचार केल्यास हा अंदाज जास्त चांगल्या प्रकारे बांधता येईल. यातील पहिल्या तीन अपूर्ण असून चौथीच काय ती पूर्ण आहे. या कवितांखाली रचनाकाल दिलेला नसल्यामुळे त्यांचा वरच्या प्रमाणे क्रम लावण्यास सबळ आधार नाही, याची मला जाणीव आहे. मी क्रम लावीत आहे तो कवितांतर्गत आधारावरूनच. हा आधार बिनबुडाचा वाटण्याचा आणि पुढेमागे या कवितांचे रचनाकाल उपलब्ध झाल्यास ठरण्याचाही संभव मी नाकारीत नाही. पण तूर्त तरी तेवढ्यावरच निर्वाह करणे प्राप्त आहे.

**तुझे न दर्शन घडले अजुनी** या कवितेची सुरुवात सरळ सरळ 'रमाई'स उद्देशून दिसते. मर्ढेकरानी 'बालकवींच्या चरित्राशी कवितेचा संबंध आहे का नाही,' असे जे संदिग्ध विधान केले आहे, त्यावरून त्यानाही अशी शंका आलेली असावी असे वाटते. या कवितेच्या पहिल्या आठ पंक्ती रचल्यावर 'रमाई'संबंधीची आपली भावना समर्पकपणे व्यक्त होण्यासाठी त्याना रजनीची प्रतिमा आवश्यक वाटलेली दिसते. 'रमाई' व 'रजनी' या दोन प्रतिमांच्या निकटत्यासातूनच त्याना 'रमाई'संबंधीच्या आपल्या भावना जास्त स्पष्ट होतील असे वाटलेले दिसते. दिवसभराच्या व्यापातापात होरपळून निघालेल्या त्यांच्या जीवाला रात्रीच्या सृष्टिसौंदर्यात शांति लाभत असावी. त्या वेळच्या त्यांच्या उद्विग्न मनःस्थितीतही तशाच स्वरूपाच्या शांतीची अपेक्षा त्याना 'रमाई'पासून असावी, असे वाटते. या कवितेची कच्ची रचना झाल्यावर त्याना त्यातील 'रमाई'चा –तिचा नामनिर्देश नसला तरी– वैयक्तिक उल्लेख काव्यदृष्ट्या वा व्यवहारदृष्ट्या अनुचित वाटला असावा. तो संपूर्ण गाळून टाकण्याच्या हेतूने त्यानी **रजनीस आवाहन** ही दुसरी कविता रचलेली दिसते. पहिली कविता हरिभगिनी या जातीत आहे तर दुसरी शुक्रकला या जातीत. हा वृत्ता-

✩ कंसातील आकडे '**समग्र बालकवी**' या संग्रहातील पृष्ठांकांचे आहेत. '**बालकवींची समग्र कविता**' या संग्रहात २, ३ व ४ या कविता अनुक्रमे ३८, १२३ व १२९ या पृष्ठांवर आहेत.

तील बदल पहिल्या कवितेतील बंधातून पूर्णपणे सुटण्याकरिता असावा. या कवितेत त्यानी

नसता कल्लोल, दिवसाचा, अवघा स्वार्थ चराचा
वारे उष्ण फिरे, वणव्यात, दग्ध मना जाळीत

अशा स्वतःच्या वेदनाच केवळ व्यक्त करून मनःशांती करिता रजनीस आवाहन केलेले आहे.

'रमाई'चा उल्लेख टाळला, कवितेचे वृत्त बदलले तरी या दुसऱ्या कवितेतही त्याना 'रमाई'च अभिप्रेत आहे हे,

ये, ये, ये आई, ये बाई, रजनिमुखी लवलाही

या पहिल्या चरणानेच स्पष्ट होते. हे आवाहन रजनीस नसून रजनिमुखीस आहे आणि

आतुर गे डोळे, बघण्याला, रूप तुझे अवलीला

अशी 'रमाई'च्या दर्शनाची आतुरता यात व्यक्त झालेली दिसते.

दुसऱ्या कवितेत 'रमाई'चा उल्लेख टाळला तरी तिच्यात ती डोकावत असलेली दिसते, हे बालकवीना जाणवलेले असावे. 'रमाई'ची ही अस्फुट प्रतिमाही पुसून टाकावी, या हेतूने त्यानी रजनीस (आवाहन) ही तिसरी कविता रचण्यास घेतलेली दिसते. हिची सुरुवात 'ये, ये, ये आई, ये बाई, ये रजनी लवलाही,' अशी आहे. यातील 'रजनीमुखी' ऐवजी 'रजनी' हा बदल लक्षात घेण्याजोगा आहे. पुढे जोपर्यंत आपण स्वतःच्या दुःखातून बाहेर पडून सबंध सृष्टीच्या दुःखाशी समरस होत नाही, तोपर्यंत रजनीच्या रूपाने 'रमाई'च आपल्या कवितेत आल्याशिवाय राहणार नाही, असे वाटल्यामुळेच की काय, या तिसऱ्या कवितेत त्यानी मी, माझ्या, मजला असे प्रथमपुरुषी उल्लेख पूर्णपणे टाळून,

स्वप्ने भयदायी, दिवसा ही, सृष्टिबालिका पाही अशी स्वतःच्या ठिकाणी सृष्टीची योजना केलेली दिसते. पण या बदलानेही त्याना समाधान प्राप्त झालेले दिसत नाही. त्यानी ही कविता सहा ओळीनंतर सोडून दिलेली दिसते. याचे कारण बहुधा तिचे वृत्त असावे. पहिल्या कवितेच्या बंधातून सुटण्याकरिता त्यानी हरिभगिनी सोडून शुक्रकलेचा आश्रय केला होता, पण तिची उडती चाल त्याना थिल्लर व म्हणून आपल्या भावनेशी न जुळणारी वाटलेली दिसते, म्हणून **आवाहन** या चौथ्या कवितेत ते आपल्या भावनेशी जुळणाऱ्या हरिभगिनीकडेच परत आलेले दिसतात.

अशा रीतीने 'रमाई'चा रजनीत संपूर्णपणे लोप करून टाकणे, स्वतःच्या वैयक्तिक दुःखास सृष्टीच्या दुःखाचे व्यापक रूप देणे आणि आपल्या भावनेस अनुकूल असे वृत्त निवडणे, या तिन्ही बाबतीत यश आलेसे वाटल्यावर बालकवींनी ही चौथी कविता प्रथम 'रमाई'स दाखविण्याकरिता सोनाळकरांकडे आणि नंतर प्रसिद्धीसाठी मनोरंजनकडे पाठविली. या चौथ्या रचनेनेही बालकवींचे संपूर्ण समाधान झालेले नव्हते हे 'कविता अभ्यास मोडल्यामुळे बोजड झाली आहे' या त्यांच्याच विधानावरून कळून येते. हीच त्यांची अखेरची कविता.

या चार कविता 'रमाई'शी संबंधित असाव्यात असा तर्क केला तरी त्यावरून बालकवी 'रमाई' संबंधावर कोणता प्रकाश पडतो? बालकवीना कोणते तरी विलक्षण दुखणे होते आणि 'रमाई'च्या दर्शनश्रवणाने त्याला उतार पडेल अशी त्याना आशा वाटत होती, असे त्यांच्या १–११–१९१७ च्या पत्रावरून आणि या चार कवितांवरून कळून येते. पण हे दुखणे कोणते ? बालकवींची पत्रे पाहिली की त्यात एकच तक्रार वारंवार ऐकू येते आणि ती म्हणजे काव्यनिर्मिती मंदावल्याची वा थांबल्याची. काव्यशक्ति मंदावणे आणि ती अजिबात नाहीशी झाली की काय अशी शंका येणे यापरते कोणते दुखणे कवीला जास्त तापदायक ? या कारणानेच 'माझी एकही कविता नाही. मी आता कवीच राहिलो नाही", "दुसऱ्या सर्व गोष्टीत आनंद आहे पण कवितेची एक ओळ नाही", "मी कधी कविता लिहीत नाही," अशी वाक्ये त्यांच्या पत्रात येतात. काव्यनिर्मिती मंदावण्याची बालकवी दोन कारणे देतातः पहिले म्हणजे पोटासाठी कामे करीत असता उत्साह व सवड न मिळणे हे आणि दुसरे म्हणजे तीव्र नैराश्य. यातील तीव्र नैराश्य हे बहुधा प्रतिभामांद्याचे कारण नसून लक्षण असावे. पण ती चिकित्सा आपणास या ठिकाणी प्रस्तुत नाही. १९१४ ते १९१८ या चार वर्षात त्यांची प्रतिभा सर्वस्वी आटलेली होती ही वस्तुस्थिती आहे. १९१४ च्या मार्चमध्ये **दीपशिखा** व **धर्मवीर** या त्यांच्या दोन कविता प्रसिद्ध झाल्या. त्यानंतर चार वर्षांनी फेब्रुवारी १९१८ मध्ये त्यानी 'मनोरंजन'कडे **संतांचा अनुवाद** व **आवाहन** या दोन कविता पाठविल्या. मध्यंतरीच्या चार वर्षांच्या दीर्घ कालावधीत त्यांची कोणतीच कविता प्रसिद्ध झालेली दिसत नाही. 'रमाई'च्या प्रसादाने आपली गेलेली प्रतिभा परत येईल, अशी आशा त्याना वाटत असावी, असे त्यांच्या या रजनीविषयक चार कवितांवरून वाटते. **आवाहन** या कवितेत रजनीस आवाहन करण्याचे एक कारण

जगन्मोहिनी काव्यविणेचा मंद पडे रणकार
ग्रहगोलांवर गंधर्वांचा एक जुळेना सूर

असे दिले आहे. वरील चार कवितांतील ही अखेरची कविता. त्यात आपल्या वैयक्तिक दुःखाला सृष्टीच्या दुःखाचे व्यापक रूप दिलेले म्हणून 'जगन्मोहिनी काव्यवीणा' व 'ग्रहगोलांवरील गंधर्व'. पण त्याच्या आधीच्या **रजनीस आवाहन** या कवितेत रजनीच्या म्हणजे 'रमाई'च्या दर्शनाने

हृदयाचे बोल, बहुमोल, खोल मनातिल खोल
ऐकू दे वाणी, हृदयाची, माझी मज......

असे आपल्या हृदयाचे बोल आपणास ऐकू येऊन आपली मूक झालेली प्रतिभा परत बोलकी होईल, अशी आशा व्यक्त झालेली आहे. **तुझे न दर्शन घडले अजुनी** या पहिल्या कवितेत तर 'रमाई'चे दर्शन.

मनोवृत्तिना फुलविल माझ्या काव्यवसंता बोलविल
........गूढगायने गाउन विश्वा हालविल

अशी उदंड श्रद्धा व्यक्त झाली आहे. सोनाळकरानी केलेले 'रमाई'चे केवळ वर्णन ऐकूनच त्याना चार वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतर **संतांचा अनुवाद** व **आवाहन** या कविता स्फुरल्या यावरून ती श्रद्धा अंतःकरणापासून होती एवढे खरे. या श्रद्धेच्या भरात 'रमाई'ची थोरवी आई, गुरुमाउली, रजनी माता, ब्रह्माण्ड व्यापणारी शक्ती अशी जास्त जास्त व्यापक होत गेलेली दिसते. हे सर्व हास्यास्पद वाटते; पण त्यात दिसून येते ती अकाली प्रतिभा आटलेल्या एका कविहृदयाची तडफड आणि ती अत्यंत करुणास्पद आहे.

●●●

[ जास्त माहितीकरिता याच विषयावरील लेखकाचे पुढील तीन लेख पहावे. (१) 'बालकवि आणि रमाई'– सत्यकथा, सप्टेंबर १९६३; (२) 'बालकवि आणि रमाई'– अभिरुचि, सप्टेंबर १९६६ आणि (३) 'बालकवींचा मृत्यु'– सत्यकथा, डिसेंबर १९६६. ]

# चिंध्या

—सदानंद रेगे

**आकाश** केव्हांपास्नं ढगाळून राहीलं होतं. आत्महत्त्या करणाऱ्या माणसाला वाटत असावं तसं आकाश जड झालं होतं. चौफेर सगळा धूर साचला होता. मधूनच एकदा वीज चकचकली. थोडसं गड़गडलंहि. पण पाऊस काही पडला नाही.

हळू हळू रात्र होऊ लागली. पावसाच्या पागोळ्या ठिबकाव्यात तसे जिकडे तिकडे दिवे लागले.

पोरांचे आवाज—मोटारींचे आक्रोश—पाखरांचं कुलकुलणं—सगळ्या आवाजांचा जणु एक आवाज होऊन बसला होता. नाक्यावरच्या देवळात वरचेवर घंटा घणघणत होत्या.

मग हळू हळू रेडिओ लागले. बातम्या—गाणी—नाटकं—हवामान—पण अजून पावसाचा पत्ता नाही. आकाश आत्महत्त्या करणाऱ्या माणसासारखं गुडघे पोटाशी दुमडून बसलं होतं. आकाशाच्या डोळ्याना तळ नव्हता.

सगळं शहर झोपलं. एकदा या कुशीवरून त्या कुशीवर झालं. झाडं, घरं, टेलीफोनच्या तारांचे खांब सगळे अगदी पुतळ्यासारखे थिजल्यागत उभे होते.

अन् मग एकाएकी वाऱ्याची झुळूक आली नि मागोमाग पावसाचा खर्ज.

झिम्झिम्—झिम्झिम्—झिम्झिम्...

वळणावर एक कचऱ्याचं मोठं पिंप होतं तिथं कुणाची तरी सावली पडली. कुणीतरी चिंध्याबिंध्या गोळा करणारं.

पावसानं हळू हळू जोर धरला. तंबोऱ्यावर गार वार होताच.

ती सावली कचऱ्याच्या पिंपात उतरली नि जे जे मिळेल ते खांद्यावरच्या पोत्यात टाकू लागली.

**—नवा आकार कशासाठी ?**
**—कचऱ्याच्या पेटीत टाकण्यासाठी ?**
**—कचऱ्याच्या पेटीत कशासाठी ?**
**—मला शोधता येण्यासाठी ?**
**—तुझा शोध कशासाठी ?**
**—नव्या-नव्या-नव्या-नव्या आकारासाठी**

**मग मला संशय आला, मी माझे हात, पाय, केस जागच्या जागी आहेत की नाही याची खातरजमा करून घेतली....**





**आम्ही कोण ?**

**बाप न मानणारे आम्ही पुत्र**
**आम्ही आकाशातून पडतो**
**आम्ही षंढ . . .तरीही गुंड**
**नेहमी गळा काढून रडतो**

**आमची आहे एक चांडाळचौकडी**
**'भले भले' आम्हाला भितात!**
**भल्यानाच आम्ही शिव्या घालतो**
**'भले' (नरमून) आम्हाला**
**'शाबासकी देतात.!**

**आमचा पंथ वाढतो आहे**
**तेजीत आहेत आमचे स्फुटनिक!**
**आम्ही कोण काय विचारता**
**आम्ही बाटगे "स्वदेशी-बिटनिक! !**

**'व्यासाच्या' बुद्धिचा 'परीघ' तो काय?**
**त्याला काय कळणार अनुभव सच्चा!**
**'तिकडे' 'मामू' म्हणाला तेच खरे**
**हा व्यास (लेखकु) अगदीच बच्चा! !**

**—सदाशिव करंदीकर**

बाटल्यांची बुचं—रिकामी डबरी—कागद पत्रे—एखादा पावाचा किंवा भाकरीचा तुकडा—भाताचं ढेकूळ—

त्या सावलीचं पोतं हळू हळू भरत चाललं होतं. शहरात अशी कितीतरी पिंपं होती.

पुन्हा शहरानं कूस बदलली. घरं मात्र अगदी ढारढूर झोपली होती. पुलानी आळोखेपिळोखे दिले.

पावसाचा पंपच ऐन भरात आला होता. दिव्यांच्या पापण्यावर त्याच्या लगातार स्यालाचं चेटूक होत होतं. पानवाल्याच्या दुकानापाशी एक टॅक्सीवाला जांभई देत उभा होता.

ती सावली काही बोलत नव्हती. बोलावं असं कुणी तिच्या आसपासच नव्हतं. कचऱ्यात एखादी वस्तु मिळते का याचा शोध तिची पारदर्शी नजर घेत होती. पण संपूर्ण वस्तु तिला नको होती. तिला हवे होते वस्तूंचे तुकडे. एखाद्या बावलीचे हातपाय किंवा धडापास्नं वेगळी झालेली मान, एखादा तारा तुटलेला नि गंजून गेलेला बुलबुलतरंग.., संपूर्ण वस्तु पाहिली की ती सावली दुःखी होई. या संपूर्ण वस्तूंचा उपयोग काय? नुसत्या मखरात मांडून ठेवायच्या लायकीच्या. थाम गाळून पैसे साठवा. मग एखादा रेडिओ घ्या. तो मळेल म्हणून त्याच्यावर कव्हर घाला. ते कव्हर मळेल म्हणून त्याच्यावर आणखी कव्हर घाला. कव्हरावर कव्हर, कव्हरावर कव्हर कव्हरावर कव्हर . . . . . तळाच्या पापुद्र्याखाली फक्त एक रेडिओ...कधीहि बिघडणारा... सारखा खरखर खरखर करीत रहाणारा.....संपूर्ण वस्तूला हातहि लावायची तिची तयारी नव्हती. अशा वस्तूंची सावलीला शिसारी होती. एखादा कागदाचा तुकडा, एखादी बुटाची नाडी, एखादी कान तुटलेली कपबशी—याना म्हणावं खऱ्याखुऱ्या वस्तु....या मोडक्यातोडक्या वस्तु वितळवता येतात. त्याना दुसरा आकार देता येतो... हा कागदाचा तुकडा—तो कागदाचा तुकडा – असे सगळे कागदाचे तुकडे गोळा केले कीं त्यांचा पांढराशुभ्र नवा कागद करता येतो. कुणी सांगावं एखादा शेक्सपियर या नव्या कागदाची वाटहि पहात बसला असेल.. हा नळाचा शिसवी तुकडा...ही आंब्यांची रिकामी करंडी. ही बिनबुचाची बीअरची बाटली....हा डालडाचा डबा....हा फाटकातुटका शर्ट... ही रंगारंगाची रिबन...हे पावडरच्या डब्याचं झाकण—ही सिगारेटची पाकिटं....ही त्या पाकिटातली चांदी, हा एकटाच मागे राहिलेला बूट..हे फोनोग्राफच्या रेकॉर्डचे तुकडे....ही चिंध्यांची जगं....तुकड्यांची जगं..ही अपूर्णता..हा संपूर्णपणाचा शेवट...हा नव्या आकारांचा आरंभ....है अद्भुत...हे विलक्षण..हा चमत्कार... ही अलीबाबाची गुहा...ओपन सीसामी...ओपन...ओपन..

सावलीचा चेहरा अकस्मात् समाधानी दिसू लागला. कसलं तरी अनाकलनीय हसू तिच्या काळयाकभिन्न ओठावरून लहरत गेलं. जिला नावच नव्हतं असली काही वस्तु तिला कचऱ्यात मिळाली. ती नक्षत्रासारखी चकाकत होती. पण ती काय होती हे मात्र कुणालाच सांगता आलं नसतं. सावली सुखी होती. आता तिचा शोध संपला होता. थोड्या वेळानं पाऊस थांबेल. पाठोपाठ पहाट होईल. मग सगळं शहर हळू हळू झोपेतून जागं होईल. बाईssssदूssध—टैम्सार्फिडिया..फ्रीप्रेसे.. नवशक्तिsss....शेट, पाव हवाय् का? सकाळ झाली की सगळ्या शहराला पावाचा वास येईल....सावलीची पोतडी पार भरून गेली होती. तिच्याभोवती माशा गूं गूं करीत आवर्त काढीत होत्या. कचऱ्याच्या पेटीत मरून पडलेलं एक मांजर तिच्याकडे आशाळभूतपणानं पहात होतं.

मग पहाता पहाता ती सावली दुप्पट झाली. तिच्या खांद्यावरचं पोतं उंटाच्या मदारीसारखं दिसूं लागलं....हंचबॅक ऑफ् नात्रदाम....दुडुदुडु — दुडुदुडु — वाळवंट तुडवीत उंट चालला होता—बसती बसती परबत परबत गाता जाये बंजाsss राssss—उंट माझ्या महालाशी आला तशी पटकन् उडी घेऊन मी त्यावर स्वार झालो.

उंट शहर संपतं तिथं आला होता. दृष्टीपथात नव्हतं एक झाड की एक फूल. नव्हती पाऊलवाट की नव्हती एखादी इमारत. नुसता माळ. उघडाबोडका. लियरच्या माळासारखा— अथपासून इतिपर्यंत पसरलेला. नुसता पसरलेला.. जमीन....जमीन....जमीन.....धूळ...माती.....

सावलीचं घर इथल्या वस्तीत होतं. या वस्तीत सावलीची सावली पडत नसे. घरं सदान्‌कदा चिंध्यानी नि मोडक्या तोडक्या वस्तूनी तुडुंब भरलेली असायची. बसायला चिंध्या. नेसायला चिंध्या. निजायला चिंध्या. चिंध्यांवर पुरुष, स्त्रिया, पोरंसोरं. स्त्रियांच्या पोटात आणखी

पोरंसोरं. याही चिंध्याच. चिंध्यात ढेकूण. पिसवा. जळवा. पुष्कळ वेळा विंचूही. पांघरायला चिंध्या. उशाला चिंध्या.....

सावलीनं ती चकचकणारी वस्तु बिनछपराच्या घरातील एका तरण्याताठ्या स्त्रीच्या हातात दिली. तिनं ती उलटीसुलटी करून पाहिली नि कानाला लावली. टिक्...टिक्...टिक्..जणु चंद्रबिंबच तिच्या कानात वितळत होतं. ती सावलीला म्हणाली, हे घड्याळ आहे. सावली नुसती हसली. तिनं त्या घड्याळाचे काटे ओरबाडले नि घरासमोरच्या गटारात टाकले. आता त्या घड्याळाचा चेहरा अगदी कोराकरीत झाला होता. आत्महत्येच्या विचारात असलेलं आकाश त्यात आपलं प्रतिबिंब पहात होतं. टिक्..टिक्.. टिक्....टिक्....घड्याळातून नुसताच आवाज येत होता. काळाला डावं घालून ओंकाराला शेंडी लावणारा आवाज.......

सावलीचं घर वडारांच्या तंबूसारखं होतं. सावलीच्या घरात खच्चून माणसं भरलेली होती. सावली घरी आली. तिनं खांद्यावरचं पोतं एका कोपऱ्यात टाकलं नि त्यातलेच काही कागद काढून ती डबऱ्याच्या प्रकाशात वाचत बसली. पोरं पाणी आणायला नाक्यावरच्या नळाकडे गेली होती. त्यांच्या हातातल्या बादल्या साफ फुटलेल्या होत्या. बादल्या भरून ती राहुटीपाशी येईपर्यंत बादलीत पाण्याचा एक थेंबहि शिल्लक रहात नसे. मग पुन्हा ती नळावर जात. पुन्हा पुन्हा पुन्हा पुन्हा हाच गडे का तुझा गुन्हाऽऽऽऽ त्या पोरांचे चेहरेहि घड्याळासारखेच कोरेकरकरीत होते. डोळ्याला आत्महत्या करू पहाणारं आकाश. पोटात टिक्.... टिक्... टिक्....टिक् ...

एका पोराला कचऱ्याच्या पेटीत एक पुतळा सापडला होता. नुसताच छातीजवळचा भाग. Torso. ना शिर, ना कंबर. कंबर नसल्यामुळे कंबरेच्या खालचंहि काही नाही. त्यानं तो राहुटीच्या दारापाशीच एका फळकुटावर ठेवला होता. या पुतळ्याचे हातपाय कुठं गेले असतील? कुठल्या कचऱ्याच्या पेटीत ते पडले असतील? की त्यांची एव्हाना मातीहि होऊन गेली असेल? कुणी टाकून दिलेला असेल हा? कशासाठी ? अन् कोणाचा असेल हा पुतळा?

पहाटे मोटरखाली सांपडलेल्या दूधवाल्याचा ?

सावलीचा डोळा गळत होता. तशाच त्या डोळ्यानं ती माझ्याकडे निरखून निरखून पहात होती. जसा काही मीहि एक कागदाचा कपटाच होतो. मला ती अंतर्बाह्य वाचीत होती.

मी तिथंच पडलेली एक टोपली उचलली. त्या टोपलीत घुबडाची अंडी होती. मी टोपली वर उचलताच घुबडाची अंडी खाली पडून फुटली. टोपलीच्या तळाला आकाशाएवढं मोठं भोक होतं, त्यात घुबडाची अंडी कशी रहाणार? अंडी फुटताच आतली पिल्लं पळून गेली. अंड्याची टरफलं पाहून सावलीनं समाधानाचा सुस्कारा सोडला. नि ती म्हणाली, "छान झालं, आता या टरफलाना नवा आकार देता येईल."

'नवा आकार कशासाठी?'

'कचऱ्याच्या पेटीत टाकण्यासाठी?'

'कचऱ्याच्या पेटीत कशासाठी?'

'मला शोधता येण्यासाठी?'

'तुझा शोध कशासाठी?'

'नव्या नव्या नव्या नव्या आकारासाठी.'

मग मला संशय आला. मी माझे हात, पाय, केस जागच्या जागेवर आहेत की नाही याची खातरजमा करून घेतली. अंग चाचपू लागलो तर हातात नुसत्या चिंध्याच येऊ लागल्या.

पाऊस अजून पडतच होता. मी एक छत्रीचा सांगाडा उचलला नि राहुटीच्या बाजूलाच एक बुचांचा ढिगारा होता त्यावर येऊन बसलो. हातभट्टीच्या दारूचा वास वातावरण व्यापून उरला होता.

तेवढ्यात सावली धापा टाकीत बाहेर आली. तिच्या हातात एक भला मोठा चाकू होता.

'हा, जागचा हललास तर याद राख.'

मी दगडासारखा निश्चल बसलो. वाटेल त्या दगडासारखा नव्हे. स्मशानाच्या दारात मडकं फोडायला घेतात त्या दगडासारखा किंवा कबरीजवळच्या दगडासारखा.

सावलीनं माझ्या अंगावरचे कपडे टराटरा फाडले नि त्याच्या चिंध्या करून त्या राहुटीत नेल्या.

जे कपडे घालून मी रस्त्यावरून मिरवीत जात असे, जे कपडे घालून मी माझ्या प्रियेबरोबर फिरायला जात असे, जे कपडे घालून मी सत्यनारायणाच्या पूजेला जात असे, जे कपडे घालून मी वेश्यांकडे जात असे, जे कपडे घालून मी शेजाऱ्यांबरोबर भांडत असे, जे कपडे घालून मी तंबाखूचं पान खात असे, जे कपडे घालून मी मित्रांकडे पैसे उसने मागत असे, जे कपडे घालून मी वर्तमानपत्रातील बातम्या नि अग्रलेख वाचीत असे, जे कपडे घालून मी कानातला मळ काढीत असे, जे कपडे घालून मी स्टेशनावर तासन्तास बसून रहात असे त्या कपड्यांच्या चिंध्या झालेल्या पाहून मला रडू कोसळलं. पण डोळ्यातून ओघळल्या त्याहि चिंध्याच. (या एवढ्या चिंध्यांचं तू करणार तरी काय आहेस? पाहू, बाहुल्या करू नाही तर गोधड्या शिवू.)

सावलीला शोधायला मी चिंध्यांच्या ढिगाऱ्यात शिरलो. बराच शोध केल्यावर हाती लागलं एक बुजगावणं. गवताच्या पेंढ्यानं भरलेलं. त्याच्या डोक्यावरच्या हॅटमधून बंदुकीची गोळी आरपार गेली होती.

माझ्या अंगावर चिंध्यांचे रोमांच उभे

राहिले. भीतीनं मी किंकाळी मारणार तो तोंडातूनहि चिंध्याच बाहेर पडू लागल्या.

उत्तररात्री पाऊस थोडा उघडला. मग सावली चिंध्यांच्या ढिगाऱ्यातून बाहेर आली नि राहुटीसमोरच तिनं चिंध्यांची शेकोटी पेटवली.

"या चिंध्यांच्या पलीकडे काय आहे?"

"चिंध्याना पलीकडली बाजूच नाही."

"एखादी वस्तु कायमची..अगदी कायमची नाही का नष्ट करता येणार?"

"नाही. फार तर तिचा आकार बदलू शकेल."

"अखेरचा आकार कोणता?"

"चिंध्यांचा......"

सावली गालातल्या गालात हसत होती. अंगाला थोडी उब येताच ती माझ्याजवळ सरकून बसली.

माझ्या अंगागातून चिंध्यांचे कळपच्या कळप पळत गेले.

सावली माझ्याकडे आसूसल्यासारखी पहात होती. तिची वक्षस्थळं चंद्रबिंबाएवढी टपोर उमलून राहिली होती.

मग ती अगदी माझ्याजवळ आली नि तिनं मला आपल्या कवेत घेतलं.

तिच्या तोंडाला लसणेचा वास येत होता.

तिच्या वक्षांवर डोकं ठेवून मी केव्हा झोपी गेलो कुणाला ठाऊक?

सकाळीच—

सावलीनं आणखी एक चिंधी आपल्या पोत्यात भरली!

●●●

# क्रिकेटमधले 'कार' 'चौकार आणि षट्कार !!!'



'पावसामुळे खेळ थांबला' हे शब्द नेहमीच्या परिचयाचे आहेत, पण 'पाकोळ्यामुळे खेळ थांबला' हे शब्द नवीन आहेत. नॉटिंगहॅम व ग्लाऊसेस्टरशायर ह्यांच्यामधील एका सामन्यात क्रीडांगणावर अचानकपणे इतक्या पाकोळ्या जमल्या की काही वेळ खेळ थांबवावा लागला.

☆ ☆ ☆

'नॉटिंगहॅम सिटी ट्रॅन्स्पोर्ट' संघाच्या जेव्हा ३ बाद ३९ धांवा झाल्या तेव्हा रॉन विनफिल्ड गोलंदाजी करू लागला. त्याने आपल्या सहा चेंडूत सहा बळी घेतले. दुसरा गोलंदाज त्याच्या जागी गोलंदाजी करू लागला तेव्हा त्याच्या पहिल्याच चेंडूवर शेवटच्या फलंदाजाचा झेल क्षेत्ररक्षक रॉनने पकडला. सात चेंडू, सात बळी, ३ बाद ३९ पासून सर्व बाद ३९ !!

☆ ☆ ☆

मधली यष्टी उडूनही 'बेल्स' न उडाल्याची कथा तुम्ही ऐकली आहे? असं एकदा घडलं. एका रखरखीत दिवशी न्यू साऊथ वेल्स व व्हिक्टोरिया ह्यांच्या दरम्यान ऑस्ट्रेलियात सामना चालू होता. कडक उन्हामुळे 'बेल्स'वर असलेलं व्हार्निश वितळलं व त्यामुळे 'बेल्स' एकमेकाला घट्ट चिकटल्या. अंपायरने अर्थात् 'नॉट आऊट' असा निर्णय दिला.

☆ ☆ ☆

कसोटी सामन्यातील शतकाचं मोल किती ठरावं? अमरनाथने जेव्हा इंग्लंडविरुद्ध शतक झळकावून, इंग्लंडविरुद्ध खेळून शतक मारणारा पहिला भारतीय असा लौकिक मिळविला तेव्हा हिंदु स्त्रियानी आपल्या गळ्यातील दागिने त्याला बक्षिस दिले, एका कोट्यधिशाने दहा हजार रुपये दिले तर दुसऱ्या एकाने 'कार' दिली!

☆ ☆ ☆

दोन्ही डावात भोपळे घेऊन जाणारे खूप गोलंदाज आहेत. पण ज्या खेळाडूंनी भोपळे मिळविले नाहीत त्यात 'चतुर' फलंदाज म्हणून ह्यांचा समावेश होतो—डब्ल्यू. जी. ग्रेस, जे. बी. हॉब्स्., के. एस. रणजितसिंहजी; एच्. सट्क्लिफ; व डॉन ब्रॅडमन.

☆ ☆ ☆

एका षट्कात जास्तीत जास्त धावा ३२ निघाल्या आहेत. हा विक्रम आहे. १९३५ साली कार्डीफ येथे सामना खेळताना सी. स्मार्ट ह्या फलंदाजाने जी. हिलच्या गोलंदाजीवर ६-६-४-६-६-४ अशा 'स्मार्ट' धावा केल्या.

☆ ☆ ☆

१९११ साली होव्ह येथे ससेक्स विरुद्ध सामना खेळताना नॉटिंगहॅमशायरच्या इ. ॲलेस्टनने जलद धावा करण्याचा विक्रम केला. त्याने २२७ धांवांपैकी १८९ धावा केल्या आणि त्याही अवघ्या ९० मिनिटात, ह्यापैकी शेवटच्या ८९ धावा तर अवघ्या १५ मिनिटात केल्या व शेवटच्या जोडीने केवळ अर्ध्या तासात १३९ धावांची भर घातली. शेवटच्या जोडीसाठी ॲलेस्टनने १५२ धावांची भर घातली. जोडीदार होता डब्ल्यू. रिले. ह्यात ॲलेस्टनच्या १४२ धावा होत्या.

—गंमत्या



अनुक्रमणिका

-यशवंत दिनकर फडके



# दिवाळी अंकातील कथा

**मराठी** कथा अलिकडे उदंड वाढली आहे असं म्हणतात ते खरं आहे. यंदा प्रसिद्ध झालेल्या जवळजवळ दीडशे अंकात प्रकाशित झालेल्या कथांची संख्या अक्षरशः शेकड्यानी मोजावी लागेल. या सगळया बऱ्यावाईट कथा वाचणं अशक्य नसलं तरी अवघड आहे. शिवाय हा खटाटोप कुणी केलाच तर निराशेखेरीज काही निष्पन्न होत नाही. खरं म्हणजे सर्व दिवाळी अंक आणि त्यातल्या सर्व कथा सामान्य वाचक वाचीत नाही. हे कथा-लेखकांचंही भाग्य म्हटलं पाहिजे. नाहीतर त्यांची झाकली मूठ उघडी झाल्याशिवाय राहणार नाही. अंती- तेच तेच ठराविक ठशाचे अनुभव. त्यांची कंटाळवाणी सांकेतिक हाताळणी. कथांचे जुने आणि नवे साचे वापरून मागणीबरहुकूम पाडलेल्या कथा यामुळे वाचकांचं मन विटून गेलं असतं पण छापलेलं सगळं वाचण्यासाठी नसतं असं समंजस वृत्तीनं धरून चालणारा सर्वसामान्य वाचक आपापल्या आवडीप्रमाणे आधीच निवड करीत असतो व तेवढंच वाचीत असतो हे एका परीनं बरं आहे. मात्र दरवर्षी दिवाळी अंकात प्रसिद्ध होणाऱ्या शेकडो कथांपैकी जास्तीत जास्त कथा वाचण्याचा उपद्व्याप कुणी केलाच तर मराठी कथेविषयी टीकाकारानी रूढ केलेल्या व आपण बिनतक्रार मान्य केलेल्या कितीतरी कल्पनाना धक्का बसल्याखेरीज राहणार नाही.

गाडगीळ, गोखले, माडगुळकर-मोकाशी वगैरेंनी मराठी कथेचं स्वरुप पार पालटून टाकलं असं आपण म्हणतो. मराठी साहित्यात तथाकथित 'नवकथा' आता चांगली रूळली आहे. सामान्य वाचक आता न बुजता, न बिचकताही 'नवकथा' वाचतो. नवकथेतील नवलाई आता नाहीशी झाली आहे असं आपण मानतो. पण दिवाळी अंकातील कथा वाचताना सारखं असं वाटतं, "मराठी कथा खरोखरच कितपत बदलली आहे? केवळ संख्येचा विचार केला तरी दिवाळी अंकात प्रसिद्ध झालेल्या बहुसंख्य कथा जुन्या पठडीतल्याच आहेत असं दिसतं. माणसाच्या मनोव्यापारावर मुख्यतः भर देऊन लिहिली जाणारी, आणि अतिशय तरल, सुक्ष्म व संमिश्र अनुभवाना शब्दरूप देऊ पाहणारी नवकथा अतिशय मर्यादित खप असलेल्या फार थोड्या मासिकातून प्रसिद्ध होते. बहुसंख्य वाचक जे दिवाळी अंक वाचतात त्या अंकातल्या कथा अजूनही घटनाप्रधान असतात किंवा एखाद्या विलक्षण व्यक्तीभोवती किंवा त्या व्यक्तीच्याच एखाद्या ठसठशीत स्वभाव वैशिष्ट्याभोवती गुंफलेल्या असतात. एखाद्या बहुश्रुत गोष्टी वेल्हाळ माणसानं चटकदार निवेदन करून एखादा किस्सा रंगवून सांगावा, एखाद्या विलक्षण घटनेचं किंवा योगायोगाचं उत्कंठा वाढवीत वर्णन करावं आणि ऐकणाऱ्याला अनपेक्षित असा शेवट करून बैठक संपवावी तसं या गोष्टी वाचताना वाटतं. इतिहासामधे तर असल्या गोष्टींना लागणारा मालमसाला भरपूर! मात्र त्यासाठी इतिहासातल्या त्या त्या व्यक्तीच्या कालखंडाशी समरस होणं आवश्यक असतं. ते ज्याना साधतं ते चांगल्या ऐतिहासिक कथा लिहू शकतात. रणजित देसाईंची 'किर्लोस्कर' मधली 'असा रंगला विडा' ही ऐतिहासिक कथा, गो. नी. दांडेकरांची 'दीपलक्ष्मी'तील 'तख्त' ही कथा, लोककवी मनमोहनांची 'धनुर्धारी' तील 'लाटेवरचं जहर' ही कथा किंवा इनामदारांची वसुधेतील 'मोहोर' ही कथा या सर्व ऐतिहासिक कथा वाचनीय आहेत. यंदा प्रसिद्ध झालेली 'ढगाआडचे चांदणे' ही खांडेकरांची कथा, वोकीलांच्या हलक्या फुलक्या कथा, ठोकळांची 'किमया' किंवा, 'जगाचे बंध कोणाला' या कथा त्यांच्या ऐन उमेदीतल्या कथा-लेखनाची झलक दाखवतात.

नवकथेची चाहूल ज्यांच्या कथात प्रथम ऐकू आली असे समजले जाते त्यापैकी वामन चोरघडे हे एक कथाकार! चोरघड्यांची दीपावलीतील 'सुवास' व बागेश्रीमधील 'प्रतिव्रता' दुर्दैवाने हा लौकीक सांभाळीत नाहीत. गंगाधर गाडगीळांसारख्या अग्रगण्य नवकथाकाराने एखाद दुसरी कथा लिहून यंदा हजेरी लावली आहे. पण 'सुगंध' मधील त्यांची 'कलंक' ही कथा वाचल्यावर ही हजेरी त्यानी लावली नसती तरी चाललं असतं असं वाटतं. व्यंकटेश माडगूळकरानी मधल्या काही वर्षातलं मौन सोडून काही कथा लिहिल्या आहेत पण त्या वाचल्यावर यापेक्षा ते कितीतरी चांगल्या कथा लिहू शकतात एवढंच लक्षात येतं. गाडगीळ, माडगूळकरांच्या मानानं अरविंद गोखले, पु. भा. भावे व दि. बा. मोकाशी यानी बरंच लिहिलं आहे. कुऱ्यासारखी स्थिति



अनुक्रमणिका

झालेल्या रघूची किंवा कृत्रिम पाय बसवलेल्या बाईवर प्रेम करणाऱ्या माणसाची कथा गोखले लिहितात तेव्हा त्या घटनातील नाट्यामुळे कथा वाचाविशी वाटते पण वाचल्यानंतर या कथा वाचकाच्या मनात घर करून राहू शकत नाहीत. लाच देऊन बदली करून घेणाऱ्या शरदचं दुःख किंवा वाढदिवसाच्या दिवशी आवडती कोंबडी कापली गेल्यामुळे ती खाऊन वाढदिवस साजरा करणाऱ्या नंदूचं दुःख हे वाचणाऱ्याच्या अंतःकरणाला कुठंच भिडतच नाही. साहित्यिक हाच गोखल्यांच्या तीन कथांचा यंदा विषय झाला आहे. पण त्या कथांचेही असेच होत. पु. भा. भावे यांच्या कथा वाचताना निरनिराळे मुखवटे चढवून भावेच आपली लाडकी मतं आपल्याला ऐकवीत आहेत असं वाटतं. 'स्पर्श' मधली 'राधिका', 'व्रती' मधले 'दामूकाका' किंवा पठाणाच्या छातीवर बसलेल्या मारवाड्याचा किस्सा सांगणारा निवेदक ही सर्व विशिष्ट मतांचा आग्रहाने प्रचार करणाऱ्या भाव्यांची रूपं आहेत. त्यामुळे भाव्यांच्या कथाना काही काही ठिकाणी चक्क निबंधाचं किंवा शुष्क चर्चेचं स्वरूप येतं.

गाडगीळ, गोखले, भावे, माडगूळकर यानी निराशा केली तरी दि. बा. मोकाशींच्या कथा मात्र लक्ष वेधून घेतात. नवे प्रयोग करण्याची हिंमत व धमक मोकाशींच्या जवळ अजून आहे. त्यामुळे त्यांच्या कथाना आजही वैचित्र्य व ताजेपणा आहे. 'इंद्राचे वज्र' किंवा 'कालायन'-सारख्या विज्ञानक्षेत्रातील संशोधनावर आधारलेल्या सुरस व चमत्कारिक कथा यंदा मोकाशींनी लिहिल्या आहेत. इंद्रजित केळकर नावाच्या लोकप्रिय रहस्यकथा लेखकाची त्याचा एक वाचक कसोटी पाहतो त्याबद्दलची कथाही वेगळ्या विषयामुळे व हाताळणीमुळे लक्षात राहते. द. मा. मिरासदारानीही अशाच एका रहस्यकथा लेखकावर ओढवलेल्या प्रसंगाची कथा सांगितली आहे. पण त्या कथेच्या अखेरची कलाटणी मुद्दाम दिल्यासारखी वाटते. 'कर्फ्यू' व 'शोध' या मोकाशींच्या कथाही चांगल्या आहेत. आपल्या नेहमीच्या वाटेपेक्षा वेगळ्या वाटेने जाण्याची धडपड आनंद यादव व सौ. विजया राजाध्यक्ष यानीही केली आहे.

संख्येने हाताच्या बोटावर मोजता येण्याजोग्या पण गुणवत्तेने श्रेष्ठ अशा कथा लिहिण्याची आपली परंपरा जी. ए. कुलकर्णींनी सांभाळली आहे. नियतीच्या निष्ठूरपणामुळे अपार दुःख व आपत्ती भोगणारी सोशिक माणसं त्यांच्या 'वंश' व 'भोवरे' या कथात आढळतात. 'वंश' मधली 'करेव्वा' निपुत्रिक आहे. तसं पाहिलं तर निपुत्रिक नायिकेची व्यथा व्यक्त करण्याचा प्रयत्न करणाऱ्या वीस पंचवीस कथा नामवंत आणि नवशिक्या लेखकानी यंदा लिहिल्या आहेत. पण जी. एंच्या कथेत हे दुःख ज्या आवेगाने, उत्कटतेने व्यक्त झाले आहे त्याच्या जवळपासही या कथा येऊ शकत नाहीत. 'भोवरे' ही कथा भरघोस आहे पण भोवऱ्याची कल्पना पुन्हापुन्हा तपशीलवार स्पष्ट करून जी. ए. नी कथेची सूचकता घालवली आहे हा अपराध जी. ए. नीच केला आहे असे नाही तर अरविंद गोखले किंवा माडगूळकरासारख्या सिद्धहस्त लेखकानीही तेच केले आहे. व्यंकटेश माडगूळकरांच्या 'पारितोषक' कथेच्या अखेरीस 'अण्णासाहेब केव्हाच मरून गेले होते' असे माडगूळकर बजावून सांगतात. किंवा "गुत्ता:००१६" या कथेच्या अखेरीस गोखले आपल्या कथेचं तात्पर्य सांगतात— "या गुत्त्यात बघतात फक्त माणसाचा एकाकीपणा, अगतिकता आणि ते विसरण्यासाठी चाललेला त्याचा असहाय्य आटापिटा !" शरश्चन्द्र चिरमुल्यांच्या 'युधिष्ठिराचा रथ' या सुरेख कथेतही, विरदी–दिलीपचे जन्मरहस्य वाचकाला आधीच समजलेले असताही रूपाच्या तोंडून ते सविस्तरपणे स्पष्ट करण्याचा आटापीटा चिरमुल्यानी केला आहेच !

वाचकाच्या आकलनशक्तीवर जुन्या पिढीचे लेखक जसा अविश्वास दाखवीत व म्हणून सगळं सरळसरळ स्पष्ट सांगून टाकीत तसंच गोखले, माडगूळकर, जी. ए. किंवा चिरमुले करताना दिसतात.

लैंगिक संबंधाविषयी विशेषतः लैंगिक विकृतीविषयी आजचे कथाकार जेवढ्या मोकळेपणाने, वेडर वृत्तीने लिहितात तेवढे मागल्या पिढीतले कथाकार लिहीत नसत. या अनुभवाना शब्दरूप देताना आजवर बहिष्कृत मानले गेलेले शब्द किंवा वाक्प्रयोग बिनदिक्कत वापरले जात आहेत. माणसाला पडणारी स्वप्नं व दिवास्वप्न यांचा सढळ हाताने वापर करून व लैंगिक वासनेने लडबडलेल्या मनाचे चाळे बकाल बोलीत वर्णन करून सांगणाऱ्यांची आज साहित्यसृष्टीत चलती आहे. कथासृष्टीला अशा प्रकारच्या अनुभवांचं वावडं आहे असं नाही पण एका विशिष्ट जातीचे अनुभवच या तथाकथित नवकथेचे कां विषय व्हावेत? ते एका विशिष्ट रीतीनेच कां व्यक्त व्हावेत ? या अनुभवास शब्दरूप देताना गरज नसली तरी शिष्टसंमत नसलेले शब्द मुद्दाम वापरून आपल्या बंडखोरीचा पुरावा देण्याचा कथाकाराने कां अट्टाहास करावा ? वातावरण निर्मितीच्या नावाखाली समाजाच्या त्या त्या थरात रूढ असलेल्या शिव्या मधून मधून पेरण्यामुळें काय साधले जाते ? नवकथा लिहिण्याच्याही आता युक्त्या ठरल्यासारख्या दिसतात. त्यांचा चलाखाने वापरही केला जात आहे असे दिसते. फरक एवढाच की आपल्या कथालेखनाचे आडाखे, रचनेतल्या युक्त्या यासंबंधी जुने कथाकार मोकळेपणाने बोलत होते. पण त्यांच्या निरगाठ-उकल-कलाटणी वगैरे शब्दप्रयो-

गांची टवाळी करणारे आजचे चतुर कथा-लेखक व त्यांचे पाठीराखे यासंबंधी सिद्ध-साधक मौन बाळगीत आहेत. जुन्या साच्या-ऐवजी नवे साचे आले यातच आपण समाधान मानायचं का ?

दिलीप चित्रे यांच्या सत्यकथेतल्या 'केसाळ काळेभोर पिलू' या कथेत आजच्या नवकथेच्या सर्व मर्यादा दिसतात. 'ट्रायल'-सारखी कथा वाचताना पानवलकरांसारखे आजच्या आघाडीचे कथालेखकही सध्या 'फॅशनेबल' असलेल्या अनुभवांच्या व ते व्यक्त करण्याच्या तऱ्हेच्या आहारी गेलेले दिसतात. 'हंस' मधला त्यांचा 'ओ पास्कल' ही त्यानी आधी रंगवलेल्या कस्टम अधिकाऱ्याइतका परिणामकारक वाटत नाही. चित्रपटाचे संकलन करणाऱ्या एच्. शामलाल व के. प्यारेलाल या दुकलीची त्यानी सांगितलेली कथा मात्र पानवलकरांच्या सामर्थ्याची चुणूक दाखवते. श्री. भाऊ पाध्ये यानी लिहिलेल्या कथा अस्ताव्यस्त, अनावश्यक तपशीलाने भरलेल्या आहेत त्यामुळं काही ठिकाणी कथा गति घेते असे वाटते न वाटते तोच ती भलतीकडेच भरकटते नाहीतर गैरलागू तपशीलाच्या खोड्यात अडकून पडते.

जुन्या व नव्या वळणाच्या मराठी कथा यंदा लिहिणाऱ्यांपैकी काहींचा उल्लेख त्या त्या प्रवृत्ती दाखविण्यासाठी आतापर्यंत केला. वाचकाच्या प्रतिक्रिया म्हणून त्या नोंदवताना सूर असमाधानाचा असला तरी चांगल्या कथा यंदा लिहिल्याच गेल्या नाहीत असं नाही. जयवंत दळवींची 'आम्ही दगडच' ही कथा, आनंद यादव यांची 'ओझं' ही कथा, ए. वि. जोशी यांच्या 'नमस्ते गोपाळराव गारु' व 'वेलबुट्टी' या कथा, सौ. विजया राजाध्यक्षांची 'कमळांचे तळे' ही कथा, सदानंद रेगे यांची 'नौकाघर' ही कथा, शरच्चन्द्र चिरमुल्यांची 'युधिष्ठिराचा रथ' या कथा निश्चित वाचनीय आहेत.

या सर्व नामवंत कथाकाराइतका बोलबाला न झालेले पण चांगल्या कथा लिहिणारे काही कथाकार आहेत. त्यात श्री. वसंत फेणे, बाबूराव बागूल, ना. व्यं. देशपांडे यांचा उल्लेख करायला हवा. दिवाळी अंकाच्या निमित्ताने कथा-स्पर्धा जाहीर करून नवा लेखक शोधण्याचा प्रयत्न केला जातो. यंदाच्या कथा-स्पर्धेतल्या कथा वाचून प्रभाकर घोटे, व. न. इंगळे, रवींद्र सुर्वे या ताज्या दमाच्या कथालेखकाविषयी अपेक्षा वाढतात. नजरेत भरणारी ही काही नावे व नावलौकीक कमावलेल्या मंडळीपैकी काहींच्या वाचनीय कथा सोडल्या तर बाकीच्या शेकडो कथांमधे निवड करणे हे 'उडदामाजी काळे-गोरे' निवडण्यासारखेच आहे.

**[आकाशवाणीच्या सौजन्याने]**

●●●

## हा व्यवस्थापक सात भला....!

**वेस्ट–इंडिजचे व्यवस्थापकही स्वतःच्या वैशिष्टयाची शान राखून आहेत. कशी? ते पहा—**

मागे वेस्ट–इंडिजच्या दौऱ्यावर इंग्लंडचे हटन्, इव्हान्स व कॉम्प्टन हे सपत्निक गेले होते. ह्या तिघीजणींची व्यवस्था हटनने त्याच्या एका मित्राच्या हॉटेलमध्ये केली होती. ह्या मित्राने नंतर हटनला विचारले, "कसोटी सामन्याची तिकिटं आम्हाला मिळू शकली नाहीत. ती तुझ्या वशिल्याने मिळतील का? एकूण तीन तिकिटं आम्हाला हवी आहेत." हटन ह्या 'कठिण समया'ला धावून गेला. दुसऱ्या दिवशीच कसोटी सामना असल्यामुळे त्या तिघाना त्याने सरळ 'पॅव्हिलियन'-वर यायला सांगितले. दुसऱ्या दिवशी सकाळी नऊ वाजता ते तिघे 'पॅव्हिलियन'वर हजर झाले. कॉम्प्टन बाहेरच उभा होता तेव्हा त्याने त्या तिघाना हॉलमध्ये बसविले व त्यांच्याशी त्याच्या गप्पागोष्टी सुरू झाल्या. हटन महाशय रे नावाच्या व्यवस्थापकाकडे तिकिटासंबंधी विचारायला गेले होते. थोड्या वेळाने रे स्वतः हॉलमध्ये आला व त्या तीन नवख्या इसमाना पाहून त्याने कॉम्प्टनला तोऱ्यात विचारले— 'हे कोण आहेत? ह्यांच्याजवळ तिकिटे आहेत का?' यावर डेनिस शांतपणे म्हणाला, "रे, हे हटनचे मित्र आहेत, व



हटन आपल्यालाच भेटावयास गेला आहे. तो तुम्हाला भेटला नाही का? ह्याना तिकिटे पाहिजे आहेत. मिळतील का?" हे ऐकून संतप्त होऊन रे जवळ जवळ ओरडलाच–"छे, छे. मी काही एक ऐकायला तयार नाही. तिकिटे नाहीत ना ह्यांच्याजवळ? मग सरळ बाहेर जाऊ द्या ह्याना!" हे ऐकून कॉम्प्टनचा चेहरा कसा झाला असेल ह्याची कल्पना न केलेलीच बरी. ह्याच रे महाशयानी मागे एकदा गव्हर्नर सामना पाहण्यास आले असता, सामना पाहत असलेल्या त्यांच्या ड्रायव्हरजवळ सामन्याचं तिकिट नाही म्हणून त्याला सरळ बाहेर हाकलले होते म्हणे!

**—गंमत्या**

# पद्‌मश्री विजय हजारे !

## एक खरा खेळाडू

—वसन्त नाईक

**भारत सरकारने 'पद्‌मश्री' किताबाने गौरव केला, एम्‌ सी सी सारख्या परंपराप्रिय संस्थेने सन्माननीय सभासदत्वाने भूषविले--अशा या क्रिकेटवीरासाठी येत्या जानेवारीत वेस्ट इंडिज-बरोबर एक 'बेनिफिट' सामना खेळला जाणार आहे त्या निमित्ताने हा खास लेख....**



१९६० सालची गोष्ट. मुंबईत बडोदा वि. मुंबई या रणजी करंडकाच्या सामन्यासाठी विजय हजारे आले होते व ब्रेबर्न स्टेडियमवर मी व ते गप्पा मारीत बसलो होतो. मुंबईचे खेळाडू नेट प्रॅक्टिस करीत होते. इतक्यात आम्ही ज्या जागी बसलो होतो त्या दिशेने अचानक एक चेंडू नेट्‌वरून आला. मी ताबडतोब उठलो. क्षणभर स्टेडियमवरील आपला एकमेव झेल पकडावा असा विक्रमकारी विचार माझ्या मनात चमकून गेला. पण माझ्या-समोर बसलेल्या विक्रमवीराला त्याची जाणीवही नव्हती. समोरून आलेला चेंडू त्यानी पाहिला व आपल्या (म्हणजे आम्हा दोघांच्या) अंगावर पडत नाही असे दिसताच त्यानी चेंडू आलेल्या दिशेला दृष्टिक्षेपही टाकला नाही. फक्त मला विचारले. "काय हो, हा चेंडू बॅटीने मारलेला आला का कोणी फेकलेला आला?" धोका टळल्या-मुळे मला आता अवसान नसले तरी माफक धैर्य आले होते. तेव्हा मी विनोदाने त्याना म्हटले, 'मुंबईच्या खेळाडूंचा तुम्हाला उद्या खेळून देण्याचा विचार दिसत नाही.' यावर नेहमीप्रमाणे ते नुसते हसले. धोक्यात व संकटात कधीही डगमगून न जाणे या त्यांच्या स्वभाववैशिष्ट्याची एक छोटीशी झलकच या साध्या प्रसंगातून मला जाणवून गेली. नंतर मी विचार करू लागलो तर अशी अनेक उदाहरणे आठवू लागली.

१९५२ मधील लीड्‌सचा कसोटी सामना हिंदी संघ पहिल्या डावात प्रतिपक्षाच्या मागे. दुसरा डाव सुरू झाला आणि आपली दाणादाण उडाली. रॉय, गायकवाड व मंत्री पटापट बाद झाले. अजून फळ्यावर एकही धाव चढली नाही. स्वस्त: कर्णधार विजय हजारे पाय दुखावल्यामुळे मालिशच्या टेबलावर पडलेले. डाव सावरण्यासाठी पहिल्या डावातील शतकवीर विजय मांजरेक-रला पाठविण्यात आले. पण आज त्याचा दिवस नव्हता. पहिल्याच चेंडूला त्याचा त्रिफळा उडाला. भारताचा धावफलक ४ गडी बाद शून्य. कसोटी सामन्यात आतापर्यंत कोणत्याही संघाचा असा फजितवडा झाला नव्हता. शेवटी घाईघाईने हजारे क्रीडांगणावर उतरले. समोरचा गोलंदाज ट्रूमन आपल्या गावाच्या मैदानावर खेळत होता. त्याला प्रेक्षकांचा पूर्ण पाठिंबा शिवाय त्याने लागोपाठ दोन चेंडूत दोन बळी घेतलेले. इजा, बिजा व तिजा असा हा प्रतिपक्षाचा म्होरक्या पहिल्या चेंडूवर उडवला तर

पहिल्याच कसोटी सामन्यात 'हॅट-ट्रिक' करण्याचा बहुमान त्याच्या वाट्याला येणार होता. त्याने सर्व कसब व शक्ति खर्चून तो चेंडू टाकला. आणि हजारेंनी त्याला सीमापार टोलविले. नंतर स्वतःच्या ५० व फडकरशी १०० च्या वर भागीदारी करून डाव सावरला.

१९४३ सालचे पंचरंगी सामने. या सामन्यात विजय मर्चंट व विजय हजारे या विजयद्वयांची उच्चांक स्थापन करण्याची स्पर्धा सुरू झाली. या सामन्यांतील विक्रम मर्चंट यांचा होता (२४३ धावा). हजारे यानी मुसलमान या संघाविरुद्ध २४८ धावा काढून तो मोडला. हे पंचरंगी सामने जातीयतेवर खेळले जात असत. हिंदू, मुसलमान, पार्शी व युरोपियन (त्या काळी इंग्रजांचे राज्य असल्याने फक्त गोरे लोक या संघातून खेळत) व हिंदी ख्रिश्चन 'रेस्ट' या नावाने) खेळत. 'रेस्ट' हा हजारे यांचा संघ. सर्वात कमकुवत. आणि या संघाचा अंतिम सामना हिंदू संघाशी व हिंदू संघ म्हणजे जवळजवळ त्या वेळचा हिंदी कसोटी संघ. मर्चंट, अधिकारी, सी. एस्. नायडू, बॅनर्जी, विनू मानकड, सोहोनी, सरवटे, इत्यादींनी भरलेला. मर्चंट यानी २५० धावा काढून विक्रम परत मिळवला. हजारेंनी ५२ षट्के टाकली व पहिल्या फेरीत फक्त ५९ धावा काढल्या. रेस्ट संघाला पुन्हा खेळाण्यास दिले गेले. पहिल्या डावाप्रमाणेच त्यांची घसरगुंडी सुरू होऊन ५ गडी बाद ६० अशा धावा झाल्या. आणि हजारे बंधूंचा पराक्रम सुरू झाला. विजय धावा जमवू लागले तर विवेक प्रत्येक चेंडू अडवून प्रतिपक्षाला नामोहरम करू लागले. दिवसाअखेर विजय १२५ नाबाद.

सामन्याचा अखेरचा दिवस उजाडला. 'रेस्ट' दिवसभर खेळून सामना वांचविणार का? विजय हजारे नवीन उच्चांक करणार का? विजय यानी फटक्यावर फटके मारून द्विशतक पुरे केले. इतकेच नव्हे तर उपाहारापूर्वी शतक काढण्याचा विक्रमही केला. वास्तविक मंदगतीने धावा काढणारा फलंदाज असा हजारे यांचा लौकिक. पण या बहाद्दराने मिनिटाला १ धाव याप्रमाणे उपाहारापूर्वी १२२ धावा काढून आपला धावांक २४७ पर्यंत नेला. त्यावेळेला रेडिओवर कॉमेंटरी नव्हती. पण हजारे अजून खेळत आहेत अशी बातमी पसरताच प्रेक्षकांच्या झुंडीच्या झुंडी स्टेडियमवर जमा झाल्या. उपाहारानंतर एक चौकार मारून हजारे यानी मर्चंटचा उच्चांक मोडला. अत्यंत खिलाडूवृत्तीने मर्चंट यानी हजारे यांचे अभिनंदन केले. हजारेबंधूंच्या भागीदारीच्या बरोबर ३०० धावा झाल्या झाल्या आणि विवेकभोवती कोंडाळे करून उभे असणाऱ्या क्षेत्ररक्षकापैकी एकाने त्याना झेलबाद केले. इतका वेळ सावरलेला डाव परत घसरला व रेस्ट संघ सामना वांचवत नाही याची सर्वांना खातरी झाली. अगदी शेवटचा खेळाडू आला. हजारे अजून नाबादच होते आणि त्यांच्या २९५ धावा झाल्या होत्या. त्यानी क्षेत्ररक्षकांकडे नजर टाकली, बॅट दाबून नेहमीचा पवित्रा घेतला आणि पुढील चेंडूवर सरळ षट्कार हाणला. ३०१ धावा! आयुष्यात दोन वेळा ३०० च्या वर धावा करणारा हा एकमेव भारतीय खेळाडू. आणि षट्काराने ३०० धावा. हजारेकडून प्रेक्षकानी कधीच न अपेक्षिलेले! शेवटी ३०९ धावा काढून हा वीर बाद झाला. तंबूत परततात त्यांचे अभिनंदन करण्यासाठी प्रेक्षकांची एवढी गर्दी झाली कीं शेवटी पॅव्हिलियन मोडणार असे वाटले. यावेळी मर्चंट यानी समयसूचकता दाखवून दोन गोष्टी केल्या. एक म्हणजे हजारे याना बाल्कनीत येण्यास सांगून प्रेक्षकाना दोन शब्द सांगण्यास लावले (हजारे याना बोलण्यास उद्युक्त करणे त्याना क्रीडांगणावर बाद करण्यापेक्षा कठिण आहे.) दुसरी म्हणजे पॅव्हिलियनमधील स्त्रिया चेंगरण्याचा संभव दिसल्यामुळे सी. सी. आयचा नियम मोडून त्याना खेळाडूंच्या ड्रेसिंग रूममध्ये सुरक्षित बसविण्यात आले.

अंपायरच्या निकालाविरुद्ध कधीही भाष्य न करणे हा हजारे यांचा आणखी एक अपूर्व गुण. क्रिकेटपटूंचे कोणतेही पुस्तक वाचल्यास २-४ अंपायरना तरी शिव्या दिल्या नाहीत असे सांपडत नाही. पण हजारे यानी असा 'विक्रम' मात्र कधीच केला नाही. ऑस्ट्रेलियात शेवटच्या कसोटी सामन्यात पहिल्या डावामध्ये त्याना लिंडवॉलच्या चेंडूवर पायचीत देण्यात आले. ह्या प्रसंगाचा फोटो छापलेला आहे त्यावरून व टीकाकारांच्या भाष्यावरून ते पूर्णतः नाबाद असावेत असे दिसते. पण त्याबाबत त्यानी अक्षरही उच्चारले नाही. उलट दुसऱ्या डावात झेलबाद झाल्यावर 'रायटरच्या' बातमीदाराला त्यानी सांगितले की "मी झेलबाद (दुसऱ्या डावात) असल्याचा अंपायरचा निर्णय बरोबर आहे. कारण मी चेंडू बरोबर टोलवू शकलो नाही." पण पहिल्या डावातील अन्यायाबद्दल 'ब्र' नाही.

असाच एक प्रसंग पंचरंगी सामन्यातला. रेस्ट विरुद्ध मुसलमान सामना चालू होता १९४४ साली! यावेळी हजारे रेस्ट संघाचे कर्णधार होते आणि संघाची मदार त्यांच्यावर. सीलोनचा सात्तिवम् जोरदार खेळ खेळला व त्याने शतक फडकविले. हजारे





## 'हिट् फॉर सिक्स'

**'बॉडी लाईन' गोलंदाजीचं फॅड हे अलीकडचं नाही. एका शतकापूर्वी रेडगेटच्या 'भयंकर' वेगवान गोलंदाजीवर फलंदाज अल्फ्रेड मॅन जखमी झाला. इतका की क्रीडांगणावर लोळागोळा होऊन पडलेल्या मॅनला संरक्षकानी ताबडतोब उचलून नेला व त्या काळी 'ॲम्ब्युलन्स' नसल्यामुळे घोडागाडीच्या बंद डब्यावरील छतावर मॅनला झोपवला व त्याची इस्पितळात रवानगी केली.**

☆ ☆ ☆

**क्रिकेटचा एक 'विचित्र' सामना लिनस्टेड पार्क येथे १७९४ साली खेळला गेला. 'हिल'चे 'जंटलमन' विरुद्ध 'डेल'चे 'जंटलमन' असा हा सामना होता. पण हा सामना 'विचित्र' का? कारण तो पहिल्यापासून शेवटपर्यंत घोड्याच्या पाठीवर बसून खेळला गेला.**

☆ ☆ ☆

**'फिजी' बेटात क्रिकेट नुकतंच बाळसं धरू लागलं होतं. त्यावेळची गोष्ट - दोन जमातीत वैमनस्य निर्माण झालं, व 'क्रिकेट' तर्फे द्वंद्वयुद्ध खेळायचं असं त्यानी ठरविलं. ह्या जमातीत पोरं-म्हातारे धरून ५० व त्या जमातीतही पोरं-म्हातारे धरून ५० अशी ५०–५० खेळाडूंची 'टीम' ठरली. सामना सुरू झाला. ५० क्षेत्ररक्षक निरनिराळ्या ठिकाणी 'दबाव' धरून बसले. कोणी विकेटभोवती, कोणी झाडावर लपून बसले, कोणी घरांच्या छपरावर जाऊन बसले, कोणी कुठे, कोणी कुठे! ह्या अशा 'तऱ्हेवाईक' क्षेत्ररक्षणामुळे धावा जमविणे जिकीरीचे काम होऊन बसले की ५० जणांची 'फलंदाजी–संघ' अवघी एक धाव करू शकला. हे ५० क्षेत्ररक्षक जेव्हा फलंदाजी करू लागले तेव्हा त्यांचीही हीच स्थिति झाली. निकाली 'टाय' झाली. प्रत्येक संघाने अवघी एक धाव केली!**

☆ ☆ ☆

**सी. एफ्. रुट ह्या फलंदाजाचा विक्रम अजब आहे. हा १९२५ साली ऑस्ट्रेलियाविरुद्ध इंग्लंडतर्फे तीन कसोटी सामने 'खेळला' (!) पहिल्या अकरात समावेश असूनही तिन्ही कसोटी सामन्यात एकही डाव खेळण्याची ह्याला संधीच मिळाली नाही.**

☆ ☆ ☆

**एप्रिल १९०८ साली ओन्हल येथे डब्ल्यू. जी. ग्रेस 'जंटलमन' संघातून सरे-संघाविरुद्ध खेळत असताना 'लंच' झाला तेव्हा एकाएकी बर्फ पडू लागला. —गंमत्या**

यांच्या ६९ धावा झाल्यावर वलूचच्या एका चेंडूला त्याना पायचीत देण्यात आले. सामन्यात खेळणाऱ्या खेळाडूंच्या मतानेही ते नाबाद होते. पण स्वत: त्यानी कधीही या गोष्टीचा उल्लेख केला नाही. या सामन्यातील विनोद म्हणजे रेस्टतर्फे आटापिटा करणारा सात्तिवम् हा शेवटी हिंदू निघाला व नंतर असे बाहेर आले कीं, इतर कोणत्याही संघात जागा न मिळणाऱ्याला 'रेस्ट' संघात खेळता येते या भावनेने हा औट घटकेचा ख्रिश्चन या संघातून खेळला. सुदैवाने मुसलमानानी हा सामना जिंकला व हे गुपित फार उशीरा उघड झाले. नाहीतर हिंदु मुसलमान दंगा होऊन बांका प्रसंग ओढवला असता.

अमीर इलाही या गोलंदाजाने एका पंचरंगी सामन्यात हजारे याना दोन्ही डावात बाद केले व तेही फक्त २ व १७ धावामध्ये. त्यामुळे लगेच एक हाकाटी सुरू झाली की अमीर इलाहीला हजारे खेळू शकत नाही. क्रिकेटच्या इतिहासात अशी अनेक द्वंद्वे झाली. ब्रॅडमन–वोज, यार्डले–अमरनाथ, मॉरिस-बेडसर, डेक्स्टर-बेनो, इत्यादिकांची. हजारे यानी टीकाकाराना उत्तर दिले ते शब्दानी नव्हे तर धावानी. अमीर इलाहीच्या विरुद्ध पुढील दोन खेळीत त्यानी २६४ व २४८ धावा काढल्या.

ज्या असामान्य खेळाडूने भारताचा पडता डाव अनेक वेळा सावरला, १४ कसोटी सामन्यात नेतृत्व केले, कसोटी सामन्यात दोन्ही डावात शतक काढण्याचा बहुमान मिळविला. ५० च्या वर शतके काढणारा एकमेव भारतीय खेळाडू म्हणून लौकिक प्राप्त केला, इतर कोणत्याही भारतीय खेळाडूपेक्षा अधिक धावा (१६००० च्या वर) करण्याचा विक्रम केला, चौथ्या विकेटसाठी भागिदारीतील जागतिक उच्चांक प्रस्थापिला (गुलमहमदबरोबर ५७७ धावा), निवडसमितीचा अध्यक्ष या नात्याने क्रिकेटची निवृत्तीनंतरहि उत्कृष्ट सेवा केली, ज्याचा भारतीय सरकारने 'पद्मश्री' किताबाने गौरव केला व एम्. सी. सी.–सारख्या परंपराप्रिय संस्थेने सभासदत्वाने भूषविले, अशा वीराला "बेनिफिट"–सामना जानेवारीत मिळणार आहे. ह्या वीराला 'बेनिफिट' देऊ नये, इतर काही निकृष्ट (हजारेंच्या तुलनेने) खेळाडूना द्यावा अशी पद्धतशीर व घातक कोल्हेकुई मुंबईतील एका प्रसिद्ध दैनिकाने व त्यात नित्य पांचजन्य करणाऱ्या एका वाचीवाराने (या सर्व प्रकाराला जातीयतेचा वास येतो म्हटले तर पानिपत होईल) करावी यात आपल्या गुणग्राही मनोवृत्तीवर (की तिच्या अभावावर?) प्रकाश पडतो. अशा जागतिक कीर्तीच्या खेळाडूला 'बेनिफिट' देणे म्हणजे आपण दान करतो अशी भावना दिसलेली पाहून चीड येते. हे दान नव्हे, हा रसिकानी केलेला मानाचा मुजरा आहे! सुदैवाने नागपूर येथे वेस्ट इंडीज विरुद्धचा एक सामना 'हजारे बेनिफिट' साठी देण्यात आला आहे. विजय हजारे याना हा सामना विजयी ठरावा अशीच क्रिकेट शौकिनांची इच्छा असणार. मात्र या सामन्यानंतर ते पूर्णपणे निवृत्त होतील व जुन्या व जाणकार लोकाना 'तेहि नो दिवसा गता:' अशीच आठवण येईल. भारतीय क्रिकेटमधील विजय हजारे पर्व यानंतर संपुष्टात येईल!

●●●




# नवी व जुनी

चित्रकार व्ही. एस्. गुर्जर
**जी. डी. आर्ट.**

**आजचा** रसिक चौकस आहे, चोखंदळ आहे, बहुश्रुत आहे, नाट्य, नृत्य, संगीत, काव्य इत्यादि कलांचा रसास्वाद तो घेऊ शकतो पण आजच्या नवचित्रकलेत मात्र त्याला रंजक असे काहीच आढळत नाही. किंबहुना हे प्रकार चित्रकलेत कां सामावले गेलेत याचाहि अर्थबोध त्याला होत नाही.

आजच्या चित्रकलेत कला तर नसतेच पण चित्रहि नसते, नि हा चित्रकलेचा अभ्यास पांच वर्षाचा असतो, हे ऐकून आजचा रसिक खरोखरच भांबावून जातो. महाराष्ट्र–राज्य–प्रदर्शनात इटुकली पोरं सरकारी बक्षिसे पटकावतात. सहा वर्षाचा बंड्या जे रेखाटन सहजगत्या करू शकतो अशा रेखाटनाला–चिताडण्याला–राज्य प्रदर्शनात पारितोषिके बहाल केली जातात. मग प्रश्न उरतो एकच. हे पांच वर्षाचे चित्रकलेचे प्रशिक्षण कशासाठी? सुशिक्षितापासून खेडूतापर्यंत आणि सामान्य नागरिकापासून अगदी थेट राष्ट्रपतीपर्यंत सर्वानाच असेच वाटत आहे.

नामदार छगला यानी एका प्रदर्शनाच्या उद्घाटनाचे वेळी असे आवर्जून आवाहन केले होते की "समाजाची वैचारिक, सांस्कृतिक जाणकारी समृद्ध होईल, अशी कला–निर्मिति नव्या पिढीतल्या कलावंतानी केली पाहिजे."

राज्य प्रदर्शनाकडे दरसाल शेकड्यानी येणाऱ्या चित्रकृतीना हा निकष लावण्याची तत्परता जर प्रदर्शन समितीने दाखविली तर चित्रक्षेत्रातली आजची बजबजपुरी निश्चित कमी होईल. चित्रकला खऱ्याखुऱ्या अर्थाने समृद्ध होईल.

विज्ञान, शास्त्र, कला यापैकी कोणत्याहि शिक्षणक्रमाची आंखणी करताना "सांस्कृतिक, सामाजिक नि आर्थिक विकास त्या शिक्षणामुळे साधता यावा," अशा दृष्टीनेच तो आंखला गेला पाहिजे. तरच त्या शिक्षणाला उद्याच्या व्यवहारी जगात काही अर्थ राहील. तात्कालिक फायद्यापेक्षा दूरगामी नि राष्ट्रीय हिताचा–प्रगतीचा विचार प्रामुख्याने करायला हवा. नव्या शिक्षणक्रमाची आंखणी करताना या दृष्टीकोनाला प्राधान्य मिळायला हवे.

सर जे. जे. स्कूल ऑफ आर्टमधील शिक्षणक्रम याच दृष्टीकोनातून आंखला गेला आहे. या अभ्यासक्रमात फिगर फ्रॉम कास्ट, पोर्ट्रेट, फिगर फ्रॉम लाईफ, स्टिल लाईफ, मेमरी व फिगर कॉम्पोझिशन हे प्रमुख विषय आहेत. परस्पेक्टिव्ह व ॲनॉटमी हे त्यासाठी साहाय्यक होणारे पूरक विषय आहेत. दरवर्षी सरकारी खर्चाने होणाऱ्या प्रेक्षणीय स्थळांच्या सफरी, निरनिराळे लॅन्डस्केप, ऐतिहासिक महत्वाच्या वास्तू, पुरातन लेणी इत्यादि त्यांच्या नजरेला येतात. त्यामुळे विद्यार्थ्यांच्या ज्ञानात अमोल भर टाकण्याचा उपक्रम या शिक्षणात अंतर्भूत होता. याशिवाय डिप्लोमानंतर एक वर्ष इंडियन म्यूरलच्या अभ्यासासाठी आठ निवडक विद्यार्थ्यांसाठी खास वर्ग असे. त्या सर्वाना सरकारी शिष्यवृत्त्या असत.

पण या जुन्या अभ्यासक्रमावर आज शिकवणारांचीच निष्ठा नाही, मग विद्यार्थ्यांना या अभ्यासक्रमाबद्दल ममत्व कसे वाटणार?

जुना अभ्यासक्रम पसंत नाही म्हणून निष्ठा नाही, ममत्व नाही, जुन्यापेक्षा चांगला अभ्यासक्रम आंखण्याची कळकळ नाही, हिंमत नाही. ही स्थिति शिक्षकांची. मग विद्यार्थ्यांच्या मनाचा गोंधळ उडणार नाही, तर काय होईल?

कॅ. सॉलोमन नंतर खंबीरपणे नवा अभ्यासक्रम आंखून तो कार्यवाहीत आणणारा अधिकारी आर्ट स्कूलला लाभलाच नाही.

याचमुळे चित्रशिल्पाची भारतीय परंपरा आज खंडित झाली आहे. इतर कलाक्षेत्रातील परंपरा आजहि टिकून आहे. संगीत विषयक भारताची परंपरा

फार श्रेष्ठ दर्जाची आहे. ही परंपरा राखण्यात गायक कमीपणा मानीत नाहीत. परंपरा राखून त्यात काय सुधारणा करतां येईल ती ते करतात. गवयांची सुद्धा निरनिराळी घराणी आपापल्या परंपरा सांभाळून इतरातील श्रेष्ठ आणि अनुकरणीय गुण आत्मसात करण्यात कमीपणा मानीत नाहीत.

नाटचकलेबाबत देखील काही प्रमाणात हेच आढळून येते. १५–२० वर्षांपूर्वी सिनेमा, नाटचकलेला मूठमाती देणार की काय? अशी भीति नाटचकलावंताना भेडसावीत होती. पण त्यानी प्रयत्नपूर्वक –नाटचकलेचे पुनरुज्जीवन केले, हे आपण पाहातो.

चित्रकारांनी यापासून धडा घेतला पाहिजे. ललितकला–अभ्यासकाना काही मूलभूतशास्त्रांचा सखोल अभ्यास करावा लागतो. साहित्य, नृत्य, गायन नि स्थापत्य यांच्या अभ्यासकाला व्याकरण, ताल, स्वर, तोल यात पारंगत व्हावेच लागते. तद्वतच चित्रकलेत शरीररचना–शास्त्र, यथादृष्य–चित्रणशास्त्र हे विषय अभ्यासावेच लागतात. त्याअभावी त्यांची कृती पाया नसलेल्या वास्तूप्रमाणे कोणत्याहि क्षणी कोसळल्यावांचून राहाणार नाही.

श्री. गणपतराव म्हात्रे, करमरकर, तालीम इत्यादि शिल्पकार, आगासकर, त्रिनिदाद, हळदणकर, देऊस्कर, इत्यादि जुन्या पिढीतल्या सत्यदर्शी चित्रकारानी जी परंपरा रूढ केली तीच खरीखुरी मराठी परंपरा. तिला भारतात तरी तोड नाही. **ही परंपरा टिकवली पाहिजे.**

आजची पिढी बुद्धिमान आहे, परंतु नवोदितांना सत्यदर्शी चित्र शिल्प व्यासंगापासून आज दूर ठेवले जात आहे. आणि सुलभ निर्वस्तु–कलाप्रकाराकडे त्यांचे लक्ष हेतुपुरस्सर वेधले जात आहे. याचमुळे जुन्या पिढीच्या तोडीची सत्यदर्शी चित्रशिल्प निर्मिति आज थंडावली आहे.

"व्यक्तिचित्रण ही मामुली दर्जाची कला होय." असा संभ्रम नवोदितांच्या गळी उतरविला जात आहे आणि हा अत्यंत महत्वाचा नि अर्थदायी कलाप्रकार आता फोटोग्राफीच्या गोटात समाविष्ट झाला आहे. म्हणूनच, आज जर कुणाला पोर्ट्रेट हवे असले तर, त्याला फोटो स्टुडिओ गाठावा लागतो. मग तो फोटोग्राफर आपल्या देखरेखीखाली कुणा चित्रकाराकडून ती पोर्ट्रेट्स करून घेतो. चित्रकारापेक्षां फोटोग्राफर स्वतःला श्रेष्ठ मानू लागला तो याचमुळे.

या संदर्भात सचिवालयांतील चौकशी कचेरीतील पोर्ट्रेटस् नजरेखाली घालावीत. म्हणजे आपल्याकडील व्यक्तिचित्रण ही कला कोणत्या दर्जाला पोहोचली आहे याची कल्पना येईल.

इंडियन म्यूरल, लॅन्डस्केप, सी–स्केप हे कला प्रकार व वॉटर कलर, पेस्टल, ड्राय पॉइंट, एचिंग ही माध्यमे नव्या पिढीला माहिती देखील नाहीत.

राज्य प्रदर्शनात या सर्व कला प्रकाराना यापुढे खास बक्षिसे ठेवून त्यांचे पुनरुज्जीवन झाले पाहिजे.

खरोखर आज नवोदित आणि बिनसरकारी चित्र–शिल्पकारांसाठी अशी राज्य सरकारकडे काहीच योजना नाही.

चित्र–शिक्षक हा पेशा उदात्त आहे. याबद्दल वाद नाही. परंतु प्रगत चित्रशिल्पकारांचे स्थान त्यापेक्षाहि श्रेष्ठ आहे. सांस्कृतिक प्रगतीचे एक महत्वाचे अंग जोपासण्याचे कार्य या चित्रशिल्पकारांकरवीं घडून येत असते. राज्यातील सांस्कृतिक दर्जावरून त्या राज्याची महति इतर राज्ये ठरवीत असतात.

म्हणूनच आज राज्यातील चित्रकारांची व चित्रकलेची जी परवड चालू आहे, त्यात सुधारणा होणे आवश्यक आहे. त्यासाठी काही योजना आता आंखल्या गेल्या पाहिजेत.

राज्य प्रदर्शन ही एकुलती एक योजना आज अस्तित्वात आहे. ही योजना केवळ चित्रशिल्पकला, व्यापारी कला, व हस्तकला या क्षेत्रातील फक्त बिनसरकारी, प्रगत कलावंतांसाठी असली पाहिजे. तरच या योजनेचे सार्थक होईल.

पण दुर्दैवाने या क्षेत्रात गंगा उलटी वाहात आहे. या प्रदर्शनात बाल–चित्रकला, विद्यार्थी-विभाग, फोटोग्राफी, इत्यादि बांडगुळांचा समावेश करण्यात आला आहे आणि ही उपरी बांडगुळे मूळ वृक्षांचे बहुतांश जीवन शोषण करीत आहेत. निर्मितिशून्य चित्रशिक्षकांच्या हाती मताधिक्यामुळे या प्रदर्शनाची सारी सूत्रे देण्यात आली आहेत. अभिजात चित्रकलेचे विडंबन याहून वेगळया तऱ्हेने करता येणे शक्य आहे का?

जुन्या चित्र परंपरेवर आघात करण्याचे एक महान(!) कार्य या राज्य प्रदर्शनाने केले आहे. कारण या प्रदर्शनाच्या योजकाना चित्रकाराचे, चित्रकलेचे सोयरसुतक नाही.

तसं म्हटले तर कला शिक्षक व चित्रकार ही क्षेत्रे भिन्न आहेत. पण राज्यातील हजारो शिक्षकानी संघटित हल्ला करून अल्पसंख्य असलेल्या आणि ज्यांच्यासाठी ही सरकारी योजना सुरू करण्यात आली आहे त्या निर्मितिक्षम, प्रगत चित्रकाराना माती चारली आहे. बालचित्रकलेसारखी बांडगुळे मताधिक्याच्या बळावर त्यानी राज्यप्रदर्शनात लादून आजवर ती टिकवली आहेत.

चित्रकला आज घसरली आहे. ती बालसुलभ झाली आहे. तपस्या, अभ्यास, चिंतन, यांची आज चित्रनिर्मितीसाठी आवश्यकता उरलेली नाही. त्यामुळे चित्रकलेची ही परवड होत आहे. "कला आणि शास्त्र" या दोन्हींचा संबंध नसलेला निर्वस्तु–कलाप्रकार आज फोफावला आहे.

गतिमानता हा जीवनाचा स्थायीभाव आहे. जुन्या तंत्रात हळूहळू फरक होणारच. पण या फरकात देखील तारतम्य हवे. सुसंगति हवी. बॉम्बे आर्ट सोसायटीने गेल्या जानेवारीत ७५ वर्षातील निवडक चित्रे मागवून त्यांचे एक प्रदर्शन जहांगिर आर्ट गॅलरीत भरविले होते. या प्रदर्शनामुळे गेल्या १५–२० वर्षांत चित्रकलेची कशी नि किती घसरगुंडी चालू आहे याचे दर्शन झाले. वास्तव चित्र-

अनुक्रमणिका

कलेला डावलून "आंतर-राष्ट्रीय कला" या सोज्वळ नावाखाली ॲब्स्ट्रक्टचा प्रचार सुरू झाला. आता तर निर्वस्तु कलाप्रकारापर्यंत आम्ही येऊन ठेपलो आहोत, ही प्रगति की अधोगति?

हे कला प्रकार मूळचे परदेशी–पाश्चिमात्य. तिथेहि ते अजूनहि प्रायोगिक अवस्थेत आहेत असे मानले जाते. श्री. गजानन भागवत ह्या भारतीय चित्रकाराने आपल्या या प्रकारच्या चित्रांचे प्रदर्शन नुकतेच लंडनला भरविले होते. ह्या प्रदर्शनाच्या निमंत्रण पत्रिकेत " Viewers should note that the work shown here is experimental efforts. They are mere sketches than a finished work of Art. " अशी प्रामाणिक कबुली दिली होती. पण परदेशातील कलमे भारताच्या भूमीत रुजविण्याचा प्रयत्न करणारे आमचे तरुण चित्रकार येवढाहि प्रामाणिकपणा दाखवू शकत नाहीत. हा एक तंत्रप्रधान डिझाइनवजा कला–प्रकार. याचा उपयोग फार तर "टेक्स्टाईल डिझाईन" म्हणून होऊ शकतो, तेथवरच त्याची कक्षा.

या पॉप आर्टची प्रदर्शने (One Man Shows) चित्रकलेचे काहीहि शिक्षण न घेतलेल्या सामान्य व्यक्ति देखील भरवू शकतात. या चित्रनिर्मितीसाठी रंग, ब्रश, कॅनव्हास, यांचीहि आवश्यकता नसते. हार्ड बोर्ड, प्लॉयवूड, लाकडाचा भूसा, वाळू, दोऱ्या, खिळे, डांबर, मोडक्या बाहुल्या, डब्यांची झांकणे, इत्यादिकांचा उपयोग करून त्या चित्रकृतीची कित्येक महाभागानी ताज आर्ट गॅलरीत प्रदर्शने भरविली आहेत. तर काहींनी भल्या मोठ्या लाकडी चौकटीत एकच एक रंग थापून त्यावर बोटे उठवून वेड्या वाकड्या आकाराचे कलाविष्कार सादर करून दाखविले आहेत. एका कला बहाद्दराने घोड्याचा नाल, गवत, गोणपाटाचे तुकडे इत्यादि चिकटवून ही कलाकृति एका प्रदर्शनात मांडलेली पाहाण्यात आली.

मेण, राळ, लाख, इत्यादि पदार्थ गरम करून तो खदखदणारा–फेसाळ रस प्लायवूडवर ओतून त्याला आकार द्यायचा व त्यावर फुटक्या आरशाचे तुकडे, रंगीत काचेचे मणी, त्यावर चिकटवून पुन्हा त्यावर ब्लो स्टोव्हने बुडबुडे निर्माण करायचे अशा या "Creative" कलाकृति एका आर्ट गॅलरीत प्रदर्शित केलेल्या पाहण्यात आल्या आहेत. हे नवे उच्च श्रेणीचे, निर्वस्तु कलाप्रकार, याचे वर्णन किती करावे?

हीच जर उच्च कला म्हटली जाणार असेल, तर त्यासाठी आर्ट स्कूल कशाला हवे ?

११० वर्षापूर्वी सर जमशेटजी जीजीभाई, यांच्या उदार देणगीतून आर्टस्कूलच्या सर्व सोयींनी युक्त अशा भव्य वास्तूची स्थापना झाली. उत्कृष्ट प्रकाश योजना असलेल्या प्रशस्त कलावर्गाची तरतूद केली. छायाप्रकाश शास्त्र, शरीर–रचनाशास्त्र, व्यक्तिचित्रण, निसर्गचित्रण, इत्यादि सर्व मूलभूत शास्त्रोक्त विषय

शिकविण्याची सोय केली. निष्णात् कलाचार्यांची सर्व कला प्रकार शिकविण्यासाठी सरकारने तरतूद केली. या साऱ्या खटाटोपाना आज काही अर्थ उरला आहे का?

कला शिक्षणासाठी दरसाल लक्षावधि रुपये खर्च केले जातात. त्याची फलनिष्पत्ति जर हीच असेल तर, "कला" या शब्दाची व्याख्याच बदलावी लागेल, आणि रेमब्रान्ट, मायकेल अॅन्जेलो, लिओनार्डो डव्हिन्सी इत्यादि कलावंतांच्या अमर कलाकृति आज देखील रत्न भांडाराप्रमाणे राष्ट्रीय संपत्ति म्हणून जतन करणारे पुढारलेले देश मूर्खच म्हणावे लागतील.

पाश्चात्यानी सत्यसादृश चित्रशिल्पांची येवढी अपरांपार चित्रनिर्मिति केली आहे, लॅन्डस्केप, सी—स्केप, धार्मिक, ऐतिहासिक, अध्यात्मिक, नीतीविषयक, निरागस बालके, स्त्री सौदर्य, मर्दुमकी इत्यादि अनेक विषय ते शतकानुशतके हाताळीत आहेत. त्यात नवी नवी भर टाकीत आहे. अशा कलाकृतीनी तिकडील म्युझियम्स् दुतर्फा भरून गेली. इतिहासात अजरामर होऊन गेलेल्या व्यक्तींचे कलापूर्ण पुतळे पोर्ट्रेट्स आजही नवी पिढी अपूर्वाइने पाहात आहे, थक्क होत आहे. त्यापासून स्फूर्ती घेत—नतमस्तक होत आहे. अशा असामान्य कलावंताना मानवाच्या इतिहासात महत्वाचे स्थान आहे. याची जाणीव पाश्चात्य विचारवंताना, सम्राटादि राज्यकर्त्यांना असे, व आजहि आहे.

या संदर्भात आठविलेली एक गोष्ट सांगण्याचा मोह आवरता येत नाही. एका सम्राटाचे पोर्ट्रेट एक थोर चित्रकार करीत होता. सरकारी लवाजमा बरोबर होताच. चित्रण करण्यात एकाग्रचित्त झालेल्या चित्रकाराच्या हातातला ब्रश अनवधानाने खाली पडला. आणि लगबगीने पुढे होऊन खुद्द सम्राटाने तो ब्रश उचलून चित्रकाराच्या हाती दिला.

चित्रणानंतर सम्राट लव्याजम्यासह प्रासादात परतत असताना बरोबर असलेल्या सेनापतीने सम्राटाना नम्रपणे सुनावले, की "त्यानी स्वतः ब्रश उचलून देणे, त्यांच्या दर्जाला शोभणारे नव्हते." सम्राटानी तात्काळ उत्तर दिले की लेखणीच्या एका फटकाऱ्याने मी एकाद्या शूर शिपायाची सेनापति म्हणून नेमणूक करू शकेन. मी सेनापति निर्माण करू शकतो, पण असामान्य कलावंत निर्माण करणे माझ्या आवाक्याबाहेरचे आहे. कलावंताचे स्थान लोकोत्तर आहे. ह्या लोकोत्तर कलेला मी मान दिला आहे. माझ्या पश्चात मी विसरला जाईन. पण त्याची कला अमर आहे."

खऱ्या कलेची कदर असलेल्या अशा सुसंस्कृत आणि समृद्ध देशातील चित्रकारानी नव्याने करावे, असे चित्रविषयक उरले नाहीत. कलेची अशी थोर परंपरा असलेल्या देशातील कलावंतानी नव्याचा शोध घेण्यासाठी जर काही प्रयोग आरंभले तर ते त्याना शोभतात. कारण ते कलेशी एकनिष्ठ आहेत. पाश्चात्य देशातहि व्यक्तिचित्रण या महत्त्वाच्या कलाप्रकारात आजवर फारच थोडया कलावंताना पारंगत होता आले आहे. जगातील अमर कलाकृति या सत्यदर्शी कलाप्रकारातील आहेत हे ध्यानात घेण्यासारखे आहे.

कुठल्याहि क्षेत्रात आम्ही जगाच्या मागे राहाता कामा नये हे मान्य आहे. यासाठी नित्य नव्याचा शोध घेत राहणे हे सर्वथैव योग्यच होय. साहित्य, विज्ञान, नाटय इत्यादि क्षेत्रात देखील नित्य नवे प्रयोग चालू आहेत. पण तमाम जुने तेवढे त्याज्य, मागासलेले असला प्रकार कुठेच आढळत नाही.

परंतु आपल्याकडील चित्र शिल्पकलेचा खाक्या काही वेगळाच, सत्य—सादृशसुबोध. तेवढ जुने व म्हणून हिणकस व "जेवढे दुर्बोध, अगम्य, अनाकलनीय, तेवढा त्याचा दर्जा उच्च". असा जणू संकेतच आपल्या या तथाकथित मॉडर्नवाल्यानी चित्रकला क्षेत्रात करून टाकलेला दिसतो. **पोर्ट्रेट ही कलाच नव्हे असे म्हणण्यापर्यंत यांची मजल गेली आहे.**

कला प्रदर्शनात फोटोग्राफीच्या अंतर्भावाचा मूळ उद्देश काही असो, त्यामुळे एक परिणाम निश्चित झाला कीं त्यामुळे समाजाची कलात्मक अभिरुचि अवनतीला पोहोचली. चित्र रसिकांची मार्मिकता, जाणकारी पुष्कळ अंशी नष्ट झाली, आणि नवे कला विद्यार्थी सत्यदर्शी कला या महत्वाच्या विषयात दुर्लक्ष करू लागले. परिणामतः "सत्य—दर्शी व्यक्तिचित्रण" या विषयात कच्च्या राहिलेल्यांचा एक मोठा वर्गच निर्माण झाला आहे. हा वर्ग आपल्या या मागासलेपणावर पांघरुण घालताना, त्याना साध्य न झालेली सत्यदर्शी कला म्हणजे "Camera can do it" अशा शब्दात सत्यदर्शी चित्राची ते हेटाळणी करतात. [ 'व्यक्ति—प्रतिमाचित्रणाची गरज छायाचित्रणामुळे भरून निघाली आहे. त्यामुळे ज्या ज्या बाबतीत यथातथ्यता पाहिजे तेथे तेथे छायाचित्रणाचा उपयोग जास्त सुलभ व बिनचूक होऊं शकतो.' (ललित दिवाळी अंक ६६) ज. द. गोंधळेकर, माजी डीन सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट. मुंबई ] पण हे हास्यास्पद, भ्रममूलक व आत्मघातकी आहे.

जोपर्यंत कॅमेरा कलात्मक कसोटीला उतरणारी रचनाचित्रे, व्यक्तिचित्रे, लॅन्डस्केप, रेखाचित्रे, स्मरणचित्रे, इत्यादि निर्माण करून शकत नाहीत तोवर "Camera can do it" हे विधान अज्ञानमूलक दिशाभूल करणारे व महाराष्ट्र—घातकी आहे. हे या नवोदितानी ध्यानात घेतले पाहिजे.

आजचे विद्यार्थी आलेखन (ड्रॉइंग) या विषयात कच्चे असल्याची हाकाटी खुद्द आर्टस्कूलच्या आचार्य—प्राचार्यांचीच आहे. यासाठी कला शिक्षणातल्या या मूलभूत व प्रमुख विषयाची हेळसांड यापुढे तरी केली जाऊ नय असे आव्हान सुचवावेसे वाटते.

नवा अभ्यासक्रम कसा हवा: दोन वर्षाच्या पायाशुद्ध अभ्यासानंतर ज्याला त्याला ऐच्छिक विषय निवडता येऊन त्याविषयात त्याला पारंगत होता येतील अशा कला शिक्षणाची नव्याने आंखणी करावी लागेल. त्यानेच या शिक्षणातून काही इष्ट फलनिष्पत्ती होईल.

व्यापारी कलेचा अभ्यासक्रम आखून, कार्यवाहीत आणन, तो यशस्वी करून दाखविणारे कला—संचालक; पद्मश्री—आडारकरांसारख्यानी चित्रकाराच्या भूमिकेवरून विचार करून या शिक्षणक्रमाची नव्याने आंखणी करण्याचे मनावर घेतले तरच या गोंधळातून मार्ग निघण्याची काही आशा आहे.

कला शिक्षणाचे नेतृत्व आज पद्मश्री आडारकर आणि प्रा. घोंड यांच्याकडे आहे. या दोन समर्थांनी मनावर घेतले तर आजची चित्रकलेची दुरावस्था हा हा म्हणता दूर होईल.

●●●




### वासूनाका • लहरी आणि निर्बंध सुगंध

## भाऊ पाध्ये, "वासूनाका" आणि हीरोचे अवमूल्यन

**भाऊ** पाध्यांची गणना तरुण आणि नव्या लेखकांमध्ये होत असली तरी ते वयाने फारसे तरुण नाहीत. इतकेच नव्हे तर ते माझ्या माहितीप्रमाणे निदान गेली बारा वर्षे लेखन करत आहेत. त्यांची "डोंबाऱ्याचा खेळ" ही कादंबरी ते अनेक वर्षे लिहित होते. तिचे अनेक खर्डे त्यानी बदलले. पुढील काही वर्षे प्रकाशकाच्या शोधात गेली. ट्रेड युनियन चळवळीची हकीकत उपरोधात्मक पण अत्यंत सूक्ष्म तपशीलांनिशी सांगणारी ही कादंबरी वाजीकरणात्मक प्रणयकथांचे प्रकाशक आणि शुद्ध कलावादी उच्चभ्रू प्रकाशक या दोघानीहि पुन्हा पुन्हा नाकारली. पाध्यांच्या कथा प्रसिद्ध झाल्या त्याहि अ-वाङमयीन नियतकालिकात. मग चार पाच वर्षांपूर्वी बहुधा त्यांची उमेदवारी आणि साडेसाती संपली असावी. त्यांच्या "इष्क"नावाच्या गोष्टीला "रहस्यरंजन" मासिकाच्या कथा-स्पर्धेत बक्षीस मिळाले. नंतर त्यांच्या "वैतागवाडी" ह्या कादंबरीला महाराष्ट्र राज्याचे वार्षिक वाङमयीन पारितोषिक मिळाले. आणि यंदाच्या वर्षी त्याना वर्तमानपत्रात वारंवार मथळे मिळाले, शिव्या, व्यक्तिगत टीका, स्तुति वगैरेंचा त्यांच्यावर वर्षाव झाला : तो "**वासूनाका**" या गोष्टींच्या संग्रहामुळे. "वासूनाका" pornographic आहे, त्याच्यावर सरकारने बंदी घालावी, अशी ओरड खुद्द आ. प्रल्हाद केशव अत्रे यानी सुरू केली. इतर "पिवळ्या" वृत्तपत्रानी शरमेने लाल व्हावे अशा भाषेत अत्र्यानी पाध्यांवर हल्ला चढवला. अत्र्यांचाहि विनयभंग करेल असे पुस्तक भयंकर अश्लील असणारच अशा खात्रीने आता मराठी वाचक "वासूनाका " आणि त्यावरच्या चर्चा वाचत आहे.

"वासूनाका"चाच अर्थ प्रथम वाचकाना सांगायला हवा. मुंबईच्या खालच्या वर्गाच्या बोलीभाषेत "वासू" म्हणजे "वास काढणारा", "स्त्रीला हुंगत (भुकेल्या कुत्र्याप्रमाणे) तिचा माग काढणारा." "नाका" म्हणजे अर्थातच रस्त्यांचे जंक्शन्. मुंबईतल्या रहिवाशानी "वासू" आणि "वासूनाके" नक्कीच पाहिले असतील, आणि बायकांची छेड काढणारे, आकडा लावणारे, दादागिरी करणारे, चोरटी दारू पिणारे, लैंगिक भानगडीत गुंतलेले लोकही सापडतील. हे लोक युगानुयुगे या ना त्या वेषात होते, आहेत, आणि असतील. पण त्यांचे मुंबईसारख्या औद्योगिक शहरातले आजचे जीवन सबंध भारतीय संस्कृतीतली एक नवीच घटना आहे. आणि आमच्या संस्कृतीचीच ही अनौरस संतति आता वाङमयाच्या पवित्र क्षेत्रात शिरली म्हणून वाङमयातले धर्मवेडे खवळले आहेत.

"वासूनाका" हे पुस्तक जरी नुसते documentary स्वरूपाचे असते तरी त्याने खळबळ उडवलीच असती. पण ते documentary स्वरूपाचे पुस्तक नाही. कोणी कोणी त्यातल्या challenge ची तारीफ केलेली आहे, आणि त्यात realism तर आहेच. पण हे काही त्याचे वाङमयीन मूल्य नव्हे. "वासूनाका" हे एक challenging स्वरूपाचे पुस्तक आहे. आणि या realism चे सर्वात मोठे सामर्थ्य हे की या पुस्तकातल्या गोष्टींचा निवेदक "पोक्या" हा एक मॅट्रिकपर्यंत शिकलेला पण वासूनाक्याचाच मेंबर आहे. पोक्याचा संवेदनस्वभाव (sensibility) हे "वासूनाक्या"तल्या प्रत्येक अनुभवाचे खरे माध्यम. त्यात भाऊ पाध्ये यांचा संबंध फक्त पोक्याचा निर्माता इतपतच येतो. अर्थातच पुस्तकातली भाषा, शैली, आणि नैतिक मूल्येसुद्धा पोक्याचीच. अत्र्यांसारखे टीकाकार भाऊ पाध्यानाच पोक्या समजून त्यांच्यावर तुटून पडले, कारण अशा पातळीवरच्या व्यक्तीने वाङमयीन निवेदन करायला धजणे म्हणजे सांस्कृतिक वर्णव्यवस्थेविरुद्ध बंड करण्यासारखे आहे! अत्र्यांचे दु:ख कोणालाहि समजू शकेल.

किंबहुना आजवरचे मराठी वाङमय अत्रे, फडके, खांडेकर, गाडगीळ, गोखले, पेंडसे, विद्याधर पुंडलिक, विजया राजाध्यक्ष, कमल देसाई, ज्ञानेश्वर नाडकर्णी, जी. ए. कुलकर्णी – अशा नाना तऱ्हेच्या—पण मध्यमवर्गीय-संवेदनस्वभावावर पोसले. त्यामुळे त्याला प्रकट नैतिक, कलात्मक, धार्मिक, तात्विक, आणि अध्यात्मिक परिमाणे मोठ्या सूक्ष्मतेने, जोराने, किंवा ढोबळपणे दिली गेली. असा Narcissistic मध्यमवर्गीय लेखक आणि त्याचा तितकाच Narcissistic hero, पोक्याच्या आगमनाने कदाचित् संपला असेल. त्याच्या मनोविश्लेषणात आणि आत्म्याच्या अनवस्थेत रस घेणाऱ्या लेखकांचा छुपा किंवा उघड रोमॅंटिसिझम् आणि भाऊ पाध्यांचा नीच हीरो यांचा एकत्र विचार करणे मोठ्या मोठ्या मराठी समीक्षकाना जड जाणार आहे, हे आताच स्पष्ट दिसत आहे.

पोक्याने प्रथम Vocabulary चे inflation थांबवले. त्याच्या भाषेत शब्द थोडे आहेत, आणि जे आहेत ते मारामाऱ्या, दादागिरी, स्त्रीशी संभोग, आकडा, जुगार—ह्या मध्यवर्ती कल्पनांतून आलेले. पोक्या हा एक अध्या-



अनुक्रमणिका

त्मिक आणि सांस्कृतिक पिग्मी. तो outsider नव्हे, तर inner most insider. तो ज्या जगात जगतो आहे त्या जगात जे अस्तित्वाच्या पातळीवर खरे आहे, तेवढयालाच शब्द आहेत. आणि पोक्याची भाषा आविष्कारक्षम असूनहि तिच्यात धूर्त, सूक्ष्म, अफरातफर करणारी वळणे कमीच. तिच्यात शब्दहि कमीच. अशा व्यक्तीला पाध्यानी निवेदक बनवला तेव्हा, माझ्या मते, त्यानी फार मोठया आव्हानाचा स्वीकार केला. या गोष्टीला, पाध्यांचे यशापयश काहीहि असो, महत्व आहेच.

वाचकालाहि स्वतः पिग्मी होणे कष्टाचे जाणार. कारण वाङमयाचा वाचक निदान स्वतःचा संवेदनस्वभाव heroic आहे असे मानणारा असतो. ही उदात्तता पोक्याचे निर्व्याज प्रथमपुरुषी निवेदन हिरावून घेते. तुम्हाला असे मान्य करावेच लागते की निदान पोक्याच्या जगात, "वासूनाक्या"वर, स्त्रीशी संभोग करणे, नव्या नव्या मुलींना फूस लावणे, आणि आकडा लागणे—ह्या गोष्टी म्हणजे परमेश्वरी कृपेचे परमोच्च वरदान. तसेच नाक्यावर जमून भानगडींची चर्चा करणे आणि नव्या भानगडींची strategy ठरवणे ही गोष्ट म्हणजेच दैनंदिन आयुष्यातला रसोत्कर्ष. यातला पाध्यांचा nonchalance, जो त्यांच्या तटस्थपणातून व्यक्त झालाय, तो आपण लक्ष्यात घ्या—म्हणजे "वासूनाका" provocative का, हे आपण सहज ओळखू शकाल. कनिष्ठ वर्गाच्या संवेदनस्वभावाचेच फक्त चित्रण करूनहि पाध्यानी मध्यमवर्गाच्या वर्मीवर निःशब्दपणे बोट कसे ठेवले आहे, हे बघण्यासारखे आहे. नीति म्हणजे एक Conditional reflex आणि सामाजिक मुखवटा—असे वासूनाक्याचा तत्वज्ञ फोमण्या परसू स्वतःच्या भाषेत म्हणतो. आणि नीतिकल्पनांचा संदर्भ टाळून "वासूनाक्या"च्या emotional emptiness ची ताकद कोणालाच कळणार नाही.

"वासूनाक्या"वर येताच नाक्याच्या प्रत्येक मेंबरला व्यक्तित्व प्राप्त होते. समूहाचे मंत्रित वर्तुळ आणि त्याची जादू ही या crowd-personality ची विशेषतः नाक्यावर नसताना या व्यक्तींचे व्यक्तित्व अदृश्य होते कारण ते खरेखुरे anarchist rebels, individualists नाहीतच. ते एक समाज आहेत—पाहिजे तर प्रतिसमाज म्हणा. एखाद्या primitive tribe च्या जीवनव्यवहारात, समान folk-lore, समान rites a rituals, समान प्रेरणा—यामुळे जी organic unity येते, ती वासूनाक्याच्या समूह—व्यक्तित्वाला आहे. ते rebels नाहीत, ते "परके" लोक आहेत. आणि rebels-पेक्षा आपण परक्या शेजाऱ्यानाहि जास्त भितो, कारण त्यांच्या परक्या व्यवहारात आपल्याच व्यवहारांचे व्यंगचित्र आपल्याला दिसते.

हेन्रि मिलरच्या Tropic of Capricorn मध्ये Cosmodemonic Telegraphic Company of North America आहे. तिच्यातला नोकरवर्ग आणि वासूनाक्यावरचे लोक यांच्यात फार मोठे साम्य आहे. प्रत्येकाला वेध एकाच गोष्टीचा: स्त्री. आणि स्त्री म्हणजे सृष्टीच्या सर्जनशीलतेचे मूर्तिमंत गूढ प्रतीक वगैरे आहे म्हणून नव्हे, तर संभोगातले प्रत्यक्ष thrill, त्यातला शारीरिक आनंद, हा एकच अनुभव बाकीच्या सर्व यांत्रिक आणि कंटाळवाण्या आयुष्यात महत्वाचा म्हणून. या माणसांना कुटुंबे उपचारापुरतीच आहेत, समाजात ते फक्त अपव्यवहारांपुरते आहेत, स्वतःच्या समुहात ते मैत्रीखातर आहेत, आणि ही मैत्री "वासूगिरी"च्या समान धर्मनिष्ठांवर आधारलेली आहे. ॲप्युलियसच्या ग्रीक जगात, पेट्रोनियसच्या रोमन जगात, बोकॅच्चिओच्या मध्ययुगीन इटलीत, राबेलायच्या फ्रान्समध्ये, फील्डींगच्या इंग्लंडमध्ये—आणि कालपरवाच्या हेन्रि मिलरच्या पॅरीस—न्यूयॉर्कमध्ये असेच लोक थोडयाफार फरकाने होते. मात्र वासूनाक्यावर नैतिक गुप्तरोगाची लक्षणे प्रकट झालीत की नवा picaresque anti-hero जन्माला आलेला आहे हे पाध्यानी अजून सांगितलेले नाही. त्यानी काही कथा लिहिल्यात. पण याच संवेदनस्वभावाचा पूर्ण आविष्कार "डोंबाऱ्याचा खेळ" एवढया दीर्घ कादंबरीत भाऊ पाध्ये करायला गेले, तरच त्यांची तटस्थता, आणि त्यांची आविष्कारक्षमता, खरोखर कसाला लागेल. सहज लैंगिक भानगडी करणाऱ्या शाळा कॉलेजातल्या मुली, कामगारांच्या आणि कारकुनांच्या बायका, भट्टीवाल्यांच्या आणि 'दादांच्या रखेल्या, धंदेवाईक आणि बिनधंदेवाईक वेश्या—यांचा 'वास काढणारा' 'वासू' सतत २४ तास, अनेक वर्षे, आणि जीवनातले इतरहि अनुभव घेत, नेमका कसला 'वास काढतो' हे दाखवण्याचे आव्हान आता पाध्यानी पत्करायला हवे. थोडक्यात, त्यानी आपल्या anti-hero चे समग्र महाभारत, याहून मोठ्या canvas वर रंगवायला हवे.

**—दिलीप पुरुषोत्तम चित्रे**

[ वासूनाका, लेखक: भाऊ पाध्ये, पृष्ठे : १८२; किंमत: रु. ७–५०; प्रकाशक: पॉप्युलर प्रकाशन, ताडदेव, मुंबई ३४ ].

## प्रा. फडक्यांच्या गुणदोषांचे संपूर्ण प्रातिनिधिक दर्शन घडवणारे दोन संग्रह

**प्रा.** फडक्यांच्या काही लेखांचा व लघुनिबंधांचा हा संग्रह. ह्याचे चार भाग केले आहेत.

**पहिल्या भागात** तीन लेख लघुनिबंध ह्या साहित्य प्रकाराची चर्चा करणारे आहेत. त्यात 'लघुनिबंधाला खरं महत्व आत्मनिवेदनाला आहे.....ताजेपणा, सहजपणा हे प्राणभूत गुण आहेत' ह्या सारखी ठरीव वाक्ये आहेत. ह्या तिन्ही लेखात पुनरुक्ति फार झाली आहे. 'प्रश्नोत्तरात' छापलेला लेख फारच प्राथमिक स्वरूपाचा वाटतो. तिन्ही लेखातील सार एकत्र करून एक लेख दिला असता तर अधिक बंदिस्त स्वरूप आले असते.

**दुसऱ्या भागात** त्यांचे दहा लघुनिबंध आहेत. विषयांचे वैचित्र्य व विविधता, भाषेतील रसाळपणा, व डौलदार शैली

ह्या फडक्यांच्या खास गुणानी हे लघुनिबंध वाचनीय झाले आहेत. फडक्यांची शैली किंवा लेखनाचे विषय ह्याबाबत 'गुज-गोष्टी'च्या काळातच फडके आहेत. ह्यात विशेष फरक कुठेही नाही.

**तिसऱ्या भागात** 'आत्मनिवेदनपर निबंध' आहेत. फडक्यानी सुरवातीस 'प्रत्येक लघुनिबंधात आत्मनिवेदन असते' असे म्हटल्यावर 'वेगळा' आत्मनिवेदनपर निबंध असा विभाग करणे म्हणजे परस्पर-विरोधी विधाने करण्याची कमाल झाली! ह्यातील लेख हे 'आत्मविषयक' आहेत. पहिल्या लेखात 'मी अहंकारी असलो तरी नम्र आहे' असे त्यानी विधान केले आहे. दुर्दैवाने त्यांच्या कुठल्याहि लेखात त्यांचा केवळ अहंकारच दिसतो. फडके ह्यांच्या 'आत्मनिवेदनपर' निबंधात केवळ स्वतः विषयक अहंकारी विधाने आहेत. स्वतःची चूक कबूल करता-नाहि ते अहंकारी पद्धतीनेच कबूल कर-तात. त्याना नम्रता माहीत नसावी असे वाटते. एक कबूल केले पाहिजे की हा अहंकार त्याना शोभूनहि दिसतो.

**चौथा विभाग**:—हा व्यक्तिचित्रे व स्थलचित्रे ह्यांचा आहे. त्यातील केशव-राव पाटील व नटसम्राट् गणपतराव जोशी ही व्यक्तिचित्रे अत्यंत संस्मरणीय ठरतील.

बाकी 'शि. म. परांजपे' 'हरिभाऊ आपटे' 'पंडित नेहरू' ह्यांच्या विषयीचे लेख कमालीचे सामान्य झाले आहेत. खरं म्हणजे त्यांच्या विषयी ज्या जिव्हा-ळ्याने फडक्यानी लिहावे अशी अपेक्षा होती ती पूर्ण होत नाही. निबंधसुगंधाचा गंध हा प्रसंगी धुंद करणारा असला तरी प्रसंगी हर्ष असह्य होतो. मात्र त्याचा एकसंघ परिणाम हा हिरव्या चाफ्याच्या गंधासारखा आहे असे म्हटल्यास चुकणार नाही. ••

**ना. सी. फडके** ह्यांची रसिकता व त्यांचे संगीतविषयक ज्ञान ह्याविषयी प्रत्येकास आदर वाटतो. त्यानी 'संगीत व नाट्य' ह्याविषयी अनेक लेख आजपर्यंत लिहिले आहेत. त्या लेखांमध्ये समीक्षण, विचारमंथन, रसिकतेने केलेले रसग्रहण, चोखंदळपणे केलेले दोष दिग्दर्शन व गुणवर्णन सर्व प्रकार सांपडतील. त्या लेखांचे तात्कालित्व ध्यानी धरूनहि त्यांचे प्रसिद्ध झालेले पूर्वीचे संग्रह (मुजरे, मैफल इ.) आजहि वाचनीय ठरतात. ह्या पार्श्वभूमीवर त्यांचा 'लहरी' हा टीकालेखांचा संग्रह वाचताना एक गोष्ट हटकून जाणवते ती अशी की फडके एखादी बाजू मांडायची असे आधी ठरवून हे लेख लिहावयास बसले.

त्यांची सहजता, अकृत्रिमता ते गमावून बसले आहेत.

ह्याला अपवाद फक्त पहिला लेख "जेव्हा सूर्यचंद्र एकत्र दिसेल!" संयुक्त 'मानापमान' व 'सौभद्र' ह्यांचे विलक्षण रसिकतेने, प्रसंगी भावुकपणे केलेले हे वर्णन नव्या पिढीला "खरोखर आम्ही जन्माचे अभागी" असे खात्रीपूर्वक म्हणा-यला लावले, इतके नेमके व साऱ्या घटना समोर उभ्या करणारे हे वर्णन वाचण्याचे तरी भाग्य आमच्या वाटणीस (आणि ऐकण्याचे) आहे. हेहि नसे थोडके.

त्यांचे इतर लेख हे नवनाटचाला विरोध करणारे, त्यात शृंगार नाही असे तक्रार करणारे वगैरे....म्हणजे एक विशिष्ट बाजू मांडणारे असे आहेत. त्यांचे नव-नाटचाविरुद्ध मुख्य आरोप "त्यात बुद्धि-ग्राह्य असा रुक्ष भाग फार आहे व रसाची उत्कटता वा उत्कर्ष कमी आहे." व दुसरा "त्यात शृंगाराचे प्रमाण कमी आहे." खाडिलकरांनंतर त्याना एकहि शृंगारपूर्ण नाटक दिसत नाही. त्याचे त्यानीच कारण दिले आहे कीं 'स्त्रियांची कामे स्त्रियानी करण्यास सुरवात केली' हे मान्य करूनहि त्यानी इतर नाटककारांवरती ओढलेले कोरडे चुकीचे वाटतात. तेंडुलकरांच्या, रत्नाकर मतकरींच्या एकांकिका, विद्याधर गोखल्यांची नाटके ह्यातून नर्म शृंगार आहेच कीं, (आणि 'प्रेमा तुझा रंग कसा'-मध्ये शृंगार नाही असे मत देणारे फडके दुसऱ्या आवृत्तीवरील रेपरवर 'उत्कृष्ट शृंगार असलेले नाटक असा अभिप्राय देतात हेहि विसरता कामा नये!)

अशाच प्रकारे खाडिलकर कवि होते हे सिद्ध करण्यासाठी त्यानी इतर नाटककार कवी नव्हते हे सिद्ध करण्याचा आटापीटा केला आहे. (खाडिलकरांच्या काव्यातील दोषहि त्यानी दाखवले आहेतच)

गडकरींवरती लिहिलेल्या लेखात 'त्याना चमत्कृतीची स्तिमित करण्याची हौस होती' हे त्याचे अवलोकन खरे आहे व ते त्यानी अनेक उदाहरणे देऊन सिद्ध केलेहि आहे. तद्वत् नाट्यसंगीताविषयी लिहिताना 'संगीताने नाटक तारले, मारले नाही' हाहि सिद्धान्त त्यानी उदाहरणे देऊन सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. पात्रे समोर ठेवून नाटक लिहणाऱ्यांची बाजू चुकीची असूनहि उचलण्याचा प्रयत्न केला असून त्यात शेक्सपिअरलाहि ओढले आहे. खाडिलकरांची बाजू मांडण्याचा हा पुनः एकदा आटापीटा.

आणि आजचा मराठी प्रेक्षक गद्य नाटकेहि आनंदाने बघतो. पूर्वीचाहि बघत होता. (गणपतराव जोशांची नाटके) थोडे माफक संगीत असलेले नाटकहि उत्साहाने बघतो हा आजचा अनुभव आहे. त्याला समोर एक चांगले नाटक हवे असते. गद्य की पद्य, यांचे त्यांस विशेष नाही.

संगीताविषयक दोन्ही लेख उत्तम आहेत. आजच्या संगीताची लोकप्रियता म्हणजे संगीताची पातळी उंचावल्याचे द्योतक नाही हे सांगणारा लेख तसेच चित्रपट संगीतातील 'इना मिना डिका' संस्कृतीला विरोध करणारा लेख वाचकाला विचार करावयास लावतील.

हे सारे वाचून मनाला सारखा एक प्रश्न छळतो. फडक्यांचे इंग्रजीचे वाचन अद्यावत् आहे. त्यांच्या नाट्यविषयक, संगीतविषयक व सर्वकला विषयक जाणीवा संवेदनाशील आहेत मग त्याना आज सर्व कलांचे ओघ कसे वाहत आहेत व कां, ह्याचे सम्यक्ज्ञान नसेल का?

संस्कृति संकरातून उद्भवणाऱ्या कलासंकराची नर्सगिक अवस्था ते जाणत नाहीत का?

असे नसणार.

मग हा सारा केवळ खोटा आव असेल?

नाही. फडके ढोंगीहि नसावेत—

इतर वाचकांचे काय होते कोण जाणे, मी तरी दुग्ध्यात पडलो आहे.

—प्रा. सुरेश गजेंद्रगडकर

[पृष्ठ १० वरून—पशु]

'फार वाईट झालं. लेकरांच्या आयाना नेऊ नये देवानं.'

ज्यानी ज्यानी सरलाबाईना पाहिलं होतं, त्या प्रत्येकाला त्यांच्या मृत्यूनं वाईट वाटलं. वाईट वाटलं नाही, उलट थोडं समाधानच वाटलं ते अरुणेला. ती मनाशी म्हणाली—

—आई गेलीस हे फार चांगलं झालं. एका पशूच्या तावडीतून सुटलीस. कायमची सुटलीस. या बाळंतपणातून सुखरूप पार पडली असतीस, तर आणखी वर्षा दीड वर्षात तुला सातव्या बाळंतपणाला तोंड द्यावं लागलं असतं. मग आण्णानी ढिलं झालेलं बाजलं फिरून अंगणात आणलं असतं. धोतराचा काच्या मारून उघड्या अंगानं त्यानी ते बाजलं पहिल्यापासून विणलं असतं. हे काम त्यांच्या फार आवडीचं. अगदी मनापासून आणि उत्साहानं असं एवढं एकच काम करताना मी आण्णाना पाहिलंय्. त्या कामात आण्णा तरबेज आहेत. म्हणूनच ताणून विणलेल्या बाजल्याकडं त्यांनी अभिमानानं बघितलं असतं. वाटीमधलं असतं नसतं तेल हातावर ओतून घेतलं असतं. मोठ्या कौतुकानं तळहात एकावर एक चोळत बसले असते. काही वेळानं तेच हात आपल्या भरदार छातीवर आणि पिळदार दण्डावर चोळून, काहीतरी महान् पराक्रम केल्यागत खुशीत येऊन त्यानी शड्ड् ठोकले असते—

आई सांगायला लाज वाटते पण तुमचा रात्रीचा दबल्या आवाजामधला सगळा संवाद मी ऐकत आले आहे.

त्याना मुलगा हवा होता हे खोटं. साफ खोटं. त्याना ऑपरेशन करून घ्यायला नको होतं. मग सहा महिने खंड पडला असता. बाकी कसलाच प्रयत्न करायला नको होता. जे ऐतं होईल ते हवं होतं........

आई तू गेलीस हे फार चांगलं झालं. फार चांगलं झालं.

● ●

सरलाबाईंच्या मागोमाग दोनच दिवसानं मूल गेलं. अरुणेनं आणखी एक समाधानाचा सुस्कारा सोडला. नाहीतरी कशाच्या आधारावर ते जगणार होतं? धाकट्या सीमेला अगदी कोरड्या डोळ्यानी अरुणा म्हणाली,

'सीमा, बाळ किनी आईकडं गेलंय्. आणि आई देवाकडं गेलीय्. तू रडलीस तर आई परत येणार नाही आणि बाळाला पण आणणार नाही. रडू नको हं. मी माझ्या बबीला मं मं करून देते. काय?'

पण थोड्याच दिवसात अरुणेच्या ध्यानात आलं की बहिणीना आणि बापाला नुसतं शिजवून घालण्यानं आपली जबाबदारी संपत नाही. शिजवून घालायचं तर घरात काही असायला तरी पाहिजे. विकण्यासारखी सगळी मोठमोठी भांडीकुंडी विकून झाल्यावर दामुआण्णानी घरातला शिसवी लाकडाचा छपरी पलंग विकून टाकला. चार आठ दिवस चूल पेटली. मग फिरून लाकडं सरली. तांदळाचा डबा रिकामा झाला. चहा संपला. आण्णाना सकाळी उठल्या उठल्या चहा लागे. थोडा थोडका नाही. चांगला दोन कप भरून. वशीतहि सांडायला पाहिजे. चहा मिळाला नाही अगर कमी पडला तर मग आण्णा चिडत. साखर संपली असली तर गुळाचा चाले पण चहा हवा. नाही मिळाला तर तो राग मग धाकट्या मुलीवर निघे. सीमेच्या पाठीत रपाटे बसत नाही तर सुशीच्या गालावर बोटं उमटत.

आता तर घरात चहाच्या भुकटीचा कण नव्हता. अरुणा विचारात पडली. आणि तिच्या डोक्यात एक विचार आला. तिरीमिरी सरशी ती बाळंतिणीच्या खोलीत आली. त्या अंधेऱ्या कुबट खोलीत पाळणा टांगला होता. उत्तम घोटीव शिसवी लाकडाचा. मधून मधून सुबक हस्तिदंती नक्षीकाम केलेला. पितळी कड्या

लावलेला. एकनाळकर इनामदार घराण्याच्या किती पिढ्या त्या पाळण्यात डोलल्या होत्या, सांगता येणं कठिण होतं. या पाळण्याचा अरुणेला भयंकर राग येई. त्याच्या एकेका झोक्यासरशी आपलं घर थरथरतंय् असा तिला भास होई. घरातली चूल चालती ठेवण्यासाठी आण्णानी जी फुंकाफुंकी चालविली होती, त्यात या पाळण्याची अजून पाळी आली नव्हती. कदाचित् अंधारात असल्यामुळं हा आपला वैरी आण्णाच्या दृष्टीतून सुटला असेल असं वाटून अरुणेनं तो सोडविला आणि चित्राच्या मदतीनं बाहेर आण्णांच्या सोप्यावर आणून ठेवला.

थोड्या वेळानं आण्णा आले. आण्णांची वाट पहात अरुणा मुद्दाम सोप्यातल्या खांबाला टेकून उभी होती. डोक्यावरचा अस्ताव्यस्त पटका तसाच खुंटीवर ठेवीत आण्णा त्या पाळण्याकडं पहात राहिले. त्यानी अरुणेकडं पाहिल्यासारखं केलं पण तिच्या नजेरला नजर भिडविण्याची त्यांची छाती झाली नाही. सगळ्याच मुलीना विचारावं तसं हवेत अधांतरी त्यानी विचारलं,

'अग पोरीनो, हा पाळणा बाहेर कुणी ग काढला?'

'मीच काढला' अरुणा तिरसटल्यागत म्हणाली.

'पण कशाला?'

'चहा संपलाय्. तांदूळ संपलेत. जोंधळ्याचं पीठ देखील संध्याकाळ पुरतंच आहे.' आण्णा चूप राहिले. तशी अरुणा आवाजात आणखी तिखटपणा आणीत म्हणाली

'मोडक्या बाजारात जाऊन येवढा पाळणा फुंकून या. येताना तांदूळ जोंधळे आणा आणि उद्या सकाळला चहा हवा असेल तर चहाचा पुडाहि आणा. साखर संपलीय् कधीची. वाटलं तर आणा, नाही पेक्षा गूळ घालते.'

आणि फणकाऱ्यानं अरुणा आत निघून गेली.

अरुणेच्या या उर्मट बोलण्यानं चिडलेले आण्णा स्वतःशीच चरफडले आणि तक्क्याला टेकून समोरच्या पाळण्याकडं पाहात बसले. आणि पाहाता पाहाता ते जरा हळवे झाले. खरं तर असला हळवेपणा त्यांच्या स्वभावात नव्हता. कधी कुठल्याच वेळी असं भावनावश होणं त्याना जमलं नव्हतं. 'हे कसं विकू, ते कसं विकू' असा दुबळा विचार कधी चुकून सुद्धा त्यांच्या मनाला शिवला नव्हता. सुरवातीला काही जमिनी, मग दागदागिने, पाठोपाठ भांडीकुंडी इतकंच काय पण देवासमोरची चांदीची समई यापैकी कुठलीच गोष्ट विकताना त्याना काही वाटलं नव्हतं. उलट प्रत्येक वेळी ते सरलाबाईना मोठ्या फुशारकीनं सांगत आले होते, 'मग काय करणार? सरकारनं जमिनी काढून घेतल्या म्हणून तर ही वेळ. नाही तर पोरं बाळं काय उपाशी ठेवायची होती? मी काय दारुबाजी केली नाही का रांडा ठेवल्या नाहीत' आण्णांच्या दृष्टीनं त्यांचं म्हणणं शंभर टक्के रास्त होतं. आल्या परिस्थितीत ही विका विकी अपरिहार्यच होती. म्हणून कुठलीच गोष्ट विकताना त्यांचा हात कधी कचरला नाही. त्याना कधी अपराधी वाटलं नाही. पण हा पाळणा मोडक्या बाजारात नेऊन विका असं

## सिंह गेला
## (पण गड आला नाही)

गतवर्षी ह्याच महिन्याच्या अकरा तारखेला ताश्कंद येथे ह्या उपखंडात शांतता नांदावी म्हणून भारताच्या त्या थोर सुपुत्राने कायमची 'शांति' पत्करली. शांतीचा गड जिंकण्यासाठी गेलेला आधुनिक इतिहासातला हा 'तानाजी' रणांगणावर लढता लढता पडला. शांति आली आहे. ती इये देशी नांदणार आहे. भारत पाक स्नेहाचे एक नवे पर्व सुरू होणार आहे. 'ताश्कंद स्पिरीट' नावाची अद्भुत जादू जे शतकातही साधले नाही ते घडवून आणणार आहे असे वाटले. पण प्रत्यक्ष युद्ध थांबले असले तरी 'युद्धज्वर' सरला आहे असे दुर्दैवाने म्हणवत नाही. ते स्वप्न पहात पहात आमचा लाडका लालबहादुर मात्र ताश्कंदच्या त्या शांति-गारात शांतपणे पहुडला. त्या दिवसाला आधुनिक भारताच्या महा-भारतात महत्वाचे स्थान आहे. तो दिवस आम्हाला देऊन शास्त्रीजी अमर झाले आहेत. शास्त्रीजींचे जीवन म्हणजे उक्ति आणि कृति यांचा असामान्य संगम. शास्त्री म्हणजे मूर्तिमंत त्याग, संयम, विनयशीलता, चारित्र्यसंपन्नता, मूर्तिमंत समर्पण, अखंड राष्ट्रनिष्ठा आणि अस्मितायुक्त नेतृत्वाचा महान आदर्श ! "मुहूर्तं ज्वलितं श्रेयम् । नच धूमायितं चिरम्" ह्याचे साक्षात्कारी प्रतीक म्हणजे लालबहादुर! शास्त्रीजी म्हणजे एक महान देणे आणि लेणे! सतत देऊनही न संपलेला मूर्तिमंत कुबेर म्हणजे शास्त्री! "धोतीवाले भी लढ सकते हैं" हे त्यानी सिद्ध केले. त्यामुळे ह्या खुज्यांच्या देशात खरोखर खुजे असलेले शास्त्रीजी मात्र एव्हरेस्ट शिखराएवढे उत्तुंग ठरले आहेत. आधुनिक गौरीशंकराच्या स्मृतीला अभिवादन करून आम्ही म्हणतो की "लालबहादुर शास्त्री अमर रहे."

—संपादक

अरुणानं म्हणताच मात्र आण्णा आतल्या आत कुठं तरी दुखावले गेले. या पाळण्यात इनामदारांचा वंश चालविणारा. . . . पण आता काय त्याचं? दुसरं लग्न तर शक्य नाही. म्हणजे आता निर्वंश अटळ. . . .

पण या दुःखाला आण्णानी फार वेळ थारा दिला नाही. निर्वंश होणार हे आपल्या नशीबातच होतं त्याला आपण तरी काय करणार. आणि हा पाळणा न विकता घरात ठेवला तर काय इनामदार वंशाचा अंकूर त्यातून उगवणार आहे, कुत्र्याच्या छत्रीसारखा? छट्, हे सारं मानीव दुःख आहे. म्हटलं तर दुःख आहे, म्हटलं तर नाही—

पण उद्या सकाळी चहा मिळणार नाही, हे मात्र अगदी खरंखुरं दुःख आहे. चहा—

आण्णा उठले. खुंटीला काढून ठेवलेला पटका त्यानी तसाच डोक्यावर ठेवला. दारावरून चाललेल्या एका हमालाला बोलावून त्याला तो पाळणा उचलायला सांगितलं आणि ते मोडक्या बाजाराकडे निघाले.

● ● ●



अनुक्रमणिका



दीपावलीची

सन्मानपुष्पे

# आजचा सर्वश्रेष्ठ खेळाडू गारफील्ड सोबर्स

**'मानापमान'** नाटकात पराक्रमी धैर्यधरला उद्देशून भामिनी म्हणते, 'नमवी पहा भूमी हा चालताना.' क्रिकेटमधील पराक्रमी 'धैर्यधर' जो सोबर्स त्यालाही भामिनीचं हे वर्णन अगदी योग्य आहे. सोबर्स क्रीडांगणावर उतरला की आपल्या रुबाबदार चालीने भूमी तर नमवतोच पण नेत्रदीपक फलंदाजीने गोलंदाज व क्षेत्ररक्षक ह्यानाही नमवतो! गेली दोन वर्षे 'वेस्ट–इंडिज' संघाची धुरा त्याने यशस्वीपणे सांभाळली आहे गेल्या २८ जुलैला त्याच्या वयाला कुठे तीस वर्षे पूर्ण झाली तोच वयाच्या जवळजवळ दुप्पट कसोटी सामने खेळण्याचा अभूतपूर्व विक्रम त्याने केला. (५७ कसोटी सामने) ५,००० च्या घरात धावसंख्येची मजल गाठली आहे. पराक्रम, पराक्रम तो आणखी वेगळा काय? खऱ्या अर्थाने सोबर्स हा एक अजोड 'कलावंत' आहे. रविशंकर सतारीतून किमया घडवितात, पं. भीमसेन जोशी गळ्यातून मंत्रमुग्ध करणारी आलापी करतात, बिरजू महाराज पायातून चमत्कार घडवितात. हे सगळे थोर कलावंत ठरू शकतात. सोबर्स ह्याच जातीतला थोर कलावंत आहे. तो बॅटीतून चमत्कार घडवित असतो! त्याची फलंदाजी नेत्रदीपक तर आहेच पण मनही प्रसन्न करणारी आहे. हीच तऱ्हा त्याच्या गोलंदाजीचीही. चेंडू वळविण्याची त्याची हातोटी विलक्षण आहे.

'वेस्ट-इंडिज'मधील क्रिकेटचे वैभव व शान राखण्यात सोबर्सचा फार मोठा वाटा आहे. १९२८ सालापासून वेस्ट-इंडिजने कसोटी सामन्यातून खेळायला सुरुवात केली. तेव्हापासून वेस्ट–इंडिजने जॉर्ज चॅलेनर, लेरी कॉनस्टनटाईन, जॉर्ज हेडले, वीक्स्–वॉरेल–वॉलकॉट, सारखे रथी–महारथी निर्माण केले. सोबर्सही त्यातलाच एक.

सोबर्सचा खरा खेळ दृष्टीस पडतो त्याला जेव्हा आव्हान दिलं जातं तेव्हा. आव्हान देणारा आणि आव्हान घेणारा असा त्याचा लौकिक आहे. १९६६ च्या हंगामात तिसरा कसोटी सामना खेळताना आपला डाव जाहीर करून सामना जिकण्यासाठी इंग्लिश संघाला खिलाडूपणे आव्हान दिले होते. पण इंग्लिश संघ ते आव्हान स्वीकारू शकला नाही, उलट सोबर्सच्या आक्रमक डावपेचांमुळे सामना हरला. ह्या अशा आव्हानात्मक परिस्थितीत त्याच्या हालचालीतले चापल्य बघण्यासारखे असते. क्षेत्ररक्षण करताना बिबळ्याची नजर व तितकीच सावधता, फलंदाजी करताना बिजलीच्या चपळाईने निर्माण होणारी धावसंख्या, गोलंदाजीतली किमयाही स्तिमित करणारी आणि शिवाय कप्तान म्हणून वेगळी वैशिष्टचे प्रकट करणारच! सोबर्सचं आणखी एक वैशिष्टच म्हणजे तो प्रदीर्घ काळ फलंदाजी करू शकतो आणि पुन्हा प्रेक्षकाना कंटाळा न आणता. संघावर पराभवाचे गंडांतर असतानाही तो कधी बचावात्मक फलंदाजी करीत नाही. त्याने मारलेल्या प्रत्येक फटक्यात प्रत्येक वेळी वेगळीच चमक असते. त्याच्या ह्या गुणांची तुलना फक्त फ्रँक वुलीशी होऊ शकेल. सोबर्सचे वैशिष्टच 'बॅक फुट' फलंदाजीत ठासून दृष्टीस पडते. ह्या परिस्थितीत खेळताना त्याने मारलेला चेंडू वाऱ्याच्या वेगाने सीमा गाठतो. विशेषत: 'ऑफ्'चे फटके पाहण्यासारखे असतात. कसोटी सामन्यातील त्याचे सरासरीचे "विक्रम–मानचक्र" फक्त ब्रॅडमनपर्यंत अजून पोचू शकले नाही. ब्रॅडमनची सरासरी

९९.९४ आहे!! मात्र दुसरे अतिरथी सट्क्लिफ (६०.७३), हेडले (६०.८३) व पेन्थर (५९.२३) ह्यांची सरासरी त्याने नुकतीच ओलांडली आहे. १९५८ साली किंग्स्टन येथे पाकिस्तान विरुद्ध कसोटी सामन्यात खेळताना २२ वर्षांच्या पोरसवदा सोबर्सने १० तास ८ मिनिटे खेळून नाबाद ३६५ धावा काढल्या व लेन हटनचा ३६४ धावाचा जागतिक विक्रम मोडला. हटनला ३६४ धावा करायला १३ तास २० मिनिटे लागली होती. त्यावेळी सोबर्सचे कसोटी सामन्यातील ते पहिले शतक होते! त्या नंतरच्या काळात त्याच्या कसोटी सामन्यातील फलंदाजीला चढती कमान सुरू झाली, कारण सालोसाल त्याने केलेली ही नेत्रदीपक धावसंख्याच पहा–

१९५८ पाकिस्तान विरुद्ध : ५२, ५२, ८०, ३६५ (नाबाद) १२५–१०९ नावाद (एकाच सामन्यात) १४ व २७

१९५८–५९ भारत विरुद्ध :२५, १४२ (नाबाद) ४, १९८ (धावचित), १०६ (नाबाद) २९, ९, व ४४

१९५९ पाकिस्तान विरुद्ध :०, १४, २९, ४५ व ७२

१९५९–६० इंग्लंडविरुद्ध : २२६, ०, ३१, १४७, १९, (धावचित) १४५, ९२ व ४९ (नाबाद)

१९६०–६१ ऑस्ट्रेलिया विरुद्ध:१३२, १४, ९, ०, १६८, १, १, २०, ६४ व २१ आणि अलीकडे १९६६ च्या इंग्लडदौऱ्यात: १६१, १६३ (नाबाद) १७४, ८१ असा पराक्रम केला.

असा हा सोबर्स. इंग्लंड व ऑस्ट्रेलिया ह्यांच्या विरुद्ध खूप सामने खेळल्यामुळे त्यांच्यात असलेले चांगले गुण ह्याने नेमके हेरले व आपल्या आणि आपल्या संघांच्या उन्नतीसाठी त्यांचा योग्य ठिकाणी उपयोग करून घेतला. आज परिस्थिती नेमकी उलट आहे कारण सध्या सोबर्स व वेस्ट–इंडिज संघामध्ये इतके चांगले गुण आहेत कीं इतर देशातील क्रिकेट–संघानी ते अंगिकारावेत. सोबर्सच्या अष्टपैलु व्यक्तिमत्वामुळे कसोटी सामन्यातील क्रिकेटच्या भलेपणाची नैतिक जबाबदारी त्याच्यावर आहे. कसोटी सामन्यातील खिलाडुपणाला फ्रँक वॉरेलने एक सौष्ठवयुक्त वळण लावलं. सोबर्स वॉरेलचीच परंपरा चालवतो आहे; तेव्हा क्रिकेटचे भवितव्य उज्ज्वल आहे हे निश्चित!

**–दि. श्री. कराडकर**

# जिद्दी आणि प्रयोगशील नटवर्य नानासाहेब फाटक

**स्वातंत्र्यानंतरच्या** गेल्या वीस वर्षांच्या कालात काही काही गोष्टी फार 'स्वस्त' झाल्या आहेत. सर्वत्र महागाई वाढत असल्याचा हा परिणाम आहे की काय न कळे. पण 'दि. भ.', 'नटवर्य', 'नटसम्राट', स्वरसम्राज्ञी, मादक सौंदर्याचा अॅटमबॉम्ब वगैरे बिरुदांचा सुळसुळाट झाला आहे. 'दि.भ.' हा पूर्वी 'धर्म' होता. तो धर्म पाळणारी व त्यासाठी कणाकणाने व क्षणाक्षणाने काया झिजवणारी माणसेच स्वत:ला 'दि. भ'. म्हणवून घेण्यात धन्यता मानीत असत. आज 'दि. भ.' हा धंदा झाला आहे. त्यातले पावित्र्य, तेज आज नाहीसे झाले असून सर्वत्र 'सौदा' हीच त्या बिरुदाच्या मागची भावना झाली आहे. त्यामुळे देश आहे. तो स्वतंत्र आहे पण इथे 'देशभक्त' म्हणून काही खरी खुरी 'जात' आहे का हो म्हणून शोध घ्यावा लागतो. कलेच्या क्षेत्रात–नाट्याच्या क्षेत्रातही अशा 'नकली' नटसम्राट – नटवर्यांचा सुळसुळाट झाल्याने खऱ्या नटवर्यांना सुद्धा 'अहो, नाही हो मी नटवर्य नाही' म्हणायची पाळी आली आहे पण अजूनही ही नकली व गुळगुळीत नाणी बाजारात (धंद्याच्या कलेच्या नव्हे) चालू आहेत. त्यामुळे खरी नाणी (बिचारी वाजत नसल्याने) उगीचच गोंधळात पडल्यासारखी कधी कधी वाटतात. पण अखेर अस्सल नाणीच कलेच्या दरबारात मान (मान्यता) पावतात. त्यांचा आवाज (सरकारनेच चांदी कमी केल्याने) होत नसला तरी लोक अखेर त्यांचाच जयजयकार करतात. त्याना मानतात.

नटवर्य (सच्चे) **नानासाहेब फाटक,** गायनहिरा **हिराबाई बडोदेकर** व **भालचंद्र पेंढारकर** ह्या तिघांचा मराठी नाट्य परिषदेने

गौरव केला आहे. त्यांच्या कला साधनेला मराठी नाटच–संगीत रसिकांचा प्रतिनिधी म्हणूनच जणु मानाचा मुजरा केला आहे. श्रीमति हिराबाई बडोदेकर ह्यांच्या कलासाधनेचा परिचय मराठी नाटच–संगीत रसिकाना करून देण्याची नव्याने गरज नाही. त्यांचे सूर आज घरा घरातून स्मरले–आळवले जात आहेत. ह्याच स्तंभातून पूर्वी मी त्याना त्या साऱ्यांच्या वतीने मानाचा मुजरा केला होता.

नटवर्य नानासाहेब फाटक हे नाव असेच मराठी नाटच-रसिकांच्या मनावर कोरले गेले आहे. नटाला आवश्यक असणारे सारे व्यक्तित्व परमेश्वराने नानासाहेबांना खुल्या दिलाने देऊन टाकले आहे. सुदृढ शरीरयष्टी, भव्य कपाळ, धारदार नाक, अतिशय चमकदार व बोलके डोळे, विपुल केशसंभार, सुयोग्य उंची आणि वाटेल ती फेंक सहजतेने घेऊ शकणारा आवाज– निसर्गाने एवढ्या साऱ्या गोष्टी एकाच नटाला बहाल केल्या आहेत असे निदान कालच्या तरी मराठी रंगभूमीच्या इतिहासातले नानासाहेब हे एकमेव उदाहरण म्हणता येईल. पण नटाला नुसते 'शरीर' असून भागत नाही. नटाला स्वतःचे 'मन' असावे लागते. जिद्द असावी लागते. 'साधना' लागते. 'श्रद्धा' लागते. त्याचं मन कलेच्या वेडाने भारावून जावं लागतं. नानासाहेब फाटकांनी हे सारं पत्करलं आणि श्रद्धेने जपलं. सिद्ध करून दाखवलं. सरकारी नोकरी ही ज्या काळात महापुण्य वा पर्वणी मानली जात होती अशा काळात नाटकाच्या वेडाने सोडली. आणि त्यानी रंगमंचावर पाऊल टाकले. नानासाहेब जिद्दी आहेत. करारी आहेत. स्वतंत्र बाण्याचे आहेत. स्वतःच्या विवेक बुद्धीप्रमाणे वागणारे आहेत. त्याची किमत चुकवूनही हा माणूस ताठ कण्याने उभा आहे. आपल्या अभ्यासाने त्याने काही 'भूमिका'ना स्वतःचे असे व्यक्तित्व दिले आहे. नटवर्य गणपतराव जोशी हे फाटकांचे श्रद्धास्थान! दैवत!! गणपतरावांच्या 'हॅम्लेट' ला नानांनी आज 'व्यक्तित्व' दिले आहे. त्यांच्यानंतर 'हॅम्लेट'ची भूमिका करावी नानांनीच! त्यांची ती भूमिका मी १९४० साली प्रथम पाहिली त्यांचा वृंदावन, कमलाकर, संभाजी, हॅम्लेट ही सारी मंडळी मी त्याच सुमारास पाहिली आणि त्यानंतरच्या काळात त्यांच्या झुंजारराव, सुधाकर, राघोबा, काकाजी, महाराज (सुंदर मी होणार) कुसुमाकर(श्री) विक्रांत (राक्षसी महत्वाकांक्षा) ह्या भूमिकाही मी पाहिल्या. त्यांच्या ह्या साऱ्या भूमिका पाहताना त्यांचे स्वतंत्र व्यक्तित्व नेहमीच जाणवत आले आहे. नानांचे शिक्षण त्या काळातल्या नटांच्या मानाने जास्त होते. पण ज्ञान हे काही 'पदवी'ची बंधने मानीत नाही. नानांनी वाचन तुफान केले आहे ह्याची प्रचीति त्यांच्याशी तास दोन तास गप्पा मारणाराला अक्षरशः एका बैठकीतसुद्धा येऊ शकते. गप्पा रंगल्या की, त्यात नाटकाबरोबरच राजकारण येते. शिक्षण येते. आजचा विद्यार्थी येतो आणि हृदय हलवून सोडणारे, अंतर्मुख करणारे किस्सेही येतात. नानासाहेब लहरी आहेत. पण कला काहीशी लहरी असतेच, नाही का? मागे 'वीणा' मासिकात त्यानी **'मुखवट्यांचे जग'** ही लेखमाला लिहिली. चिंतन, मनन, अभ्यास-लेखन व तुफानी वाचन ही नानासाहेबांची वैशिष्ट्ये आहेत. 'मत्स्यगंधा' नाटक पाहिल्यावर त्यांचे मन अक्षरशः भारावून गेले. त्यातला 'भीष्म' पाहून त्याना दादासाहेब खापर्डे यांची आठवण आली. 'हे नाटक तुम्ही चालवा' असे त्यानी आत्मविश्वासपूर्वक सांगितले. 'दादासाहेब खापर्डे' यांचा किस्सा सांगताना नानासाहेब गहिवरले. सत... वाचन चालू असल्याने नानासाहेब 'एव्हर फ्रेश' राहिले आहेत. नवनाटच, 'खुर्च्या' सारखे प्रयोग, रंगायनचे प्रयोग ह्याबद्दल ते जागरुक आहेत. 'एक शून्य बाजीराव' ह्या विवाद्य नाटकाबद्दल नानासाहेबांचे फार चांगले मत आहे. माधव वाटवे, विजया मेहता ह्यांच्याबद्दल हा 'रसिक' मनुष्य फार कौतुकाने बोलतो. 'खुर्च्या'त शेवटी 'स्वगत'च आहेत कीं असं म्हणून त्यांची परिभाषा समजून घेण्यासाठी नटवर्य केशवराव दाते यांच्याशी चर्चा करू शकतो. ही 'रसिकता' हाच मला नानासाहेबांचा फार मोठा विशेष वाटतो. हा कलंदर कलावंत आहे. त्यामुळेच मालकी, दिग्दर्शन वगरे बंधने त्यानी दूर ठेवली. 'स्वतंत्र'पणे कला जीवन जगले. आवश्यक तेवढा पैसा मिळविला–खर्च केला. गुरफटून घेतले नाही. त्यांच्या बोलण्या-वागण्यात जो मोकळेपणा (काहीसा फटकळपणाही) दिसतो तो त्या 'स्वतंत्र' वृत्तीतूनच आला आहे. ह्या वृत्तीमुळेच नानासाहेब प्रत्येक भूमिकेत काहीतरी स्वतंत्र, स्वतःचे असे देत आले आहेत हॅम्लेट, राघोबा, संभाजी, कुसुमाकर, वृंदावन, सुधाकर, झुंजारराव आणि कितीतरी भूमिका त्यांचे 'ठसे' उमटवून गेल्या आहेत. किंग लियर आणि शायलॉक ही त्यांची 'स्वप्ने' आहेत आणि वयाच्या अडुसष्टाव्या वर्षीही ज्याअर्थी ते ती पाहू शकताहेत त्याअर्थी नानासाहेब 'तरुण' आहेत. 'ताजे' आहेत. त्यांच्यातल्या ह्या 'ताजेपणा'लाच हे अभिवादन!

**–आदित्य**

**मशीनही एवढे चेंडू टाकणार नाही ! ..**

**एकाच डावात जास्तीत जास्त चेंडू टाकण्याचा पराक्रम वेस्ट-इंडिजच्या रामाधीनने केला आहे.**

**मे १९५७ रोजी बर्मिंगहॅम येथे इंग्लंडविरुद्ध खेळत असताना दुसऱ्या डावात त्याने ९८ षट्के (५८८ चेंडू) टाकली. त्याची सरासरी होती ९८–३५–१७९–२ हा झाला कसोटी सामन्यातील विक्रम.**

**पहिल्या प्रतीच्या सामन्यात सी. एस्. नायडूचा विक्रम आहे. १९४४–४५ साली होळकर विरुद्ध मुंबई ह्या सामन्यात खेळताना त्याने ९१७ चेंडू (१५२.५ षट्के) टाकले.**




'मराठी नाट्य समीक्षा' या परिसंवादात टीकाकार, नाटककार, प्रेक्षक इ. भूमिकेत सुप्रसिद्ध साहित्यिक



**असे पाहिले असे ऐकले**

## नाट्य-परिसंवाद (ठरीव पण ठाशीव नव्हे)

**नाट्यविषयक** परिसंवादापेक्षा नाटक पाहणे बरे (नाही का?) पण तरीही नाटकांबरोबरच (संख्येने तितके नसले तरी) परिसंवाद होतात. पूर्वीची नाटके पाहून समजत. काही तिथे (गर्दीत नाहीच समजली तर रुपयाला नाटकाचे पुस्तक मिळत असे. पण आता नाटकाच्या दराप्रमाणेच नाटकाच्या पुस्तकाच्या किमती खूप वाढल्या. त्यामुळे नाटके समजून घेणे व विकत घेणे दोन्ही कठिण होऊन बसले आहे. मग नाटके समजावून देण्यासाठी 'नाट्य-समीक्षा' आलीच. मग परिसंवाद! ठरीव पण ठाशीव मात्र नव्हेत. मुलुंड येथील 'विद्याझंकार' नांवाच्या संस्थेने असाच एक उपक्रम डिसेंबरच्या चार दिनांकाला घडवून आणला. **"मराठी नाट्य समीक्षा—काल, आज आणि उद्या"**असा विषय होता. विषयाची विभागणी छान केली होती. समीक्षक, नाटककार, नट, प्रेक्षक, दिग्दर्शक, (निर्माता) इत्यादि विविध भूमिकांतून त्या विषयासंबंधी वक्त्यानी भूमिका मांडाव्या अशी अपेक्षा होती. (संचालकांची व श्रोत्यांचीही) वक्ते नामवंत होते. पु. भा. भावे (प्रेक्षक) वसंत कानेटकर (नाटककार) ज्ञानेश्वर नाडकर्णी व वा. य. गाडगीळ (समीक्षक) आत्माराम भेंडे (नट-दिग्दर्शक) व संयोजक म्हणून गंगाधर गाडगीळ अशी रथी महारथी मंडळी त्यात होती. प्रा. भालबा केळकर हे ऐनवेळी आले नाहीत. म्हणजे प्रयत्नात कसूर नव्हती. पैशातही नव्हती (असे कळते). श्रोते प्रचंड संख्येने (म्हणण्याची पद्धत) म्हटलं तरी 'प्रचंड' नव्हते. पण अशा कार्यक्रमांची गर्दी 'प्रचंड' नसली तरी 'रसिकां'ची असते. बरंच बोलायचं तर परिसंवाद 'बरा' झाला असं म्हणता येईल. पण खरं बोलायचं झालं तर मात्र तो याहून अधिक Pointed व्हायला हवा होता असं वाटतं. (भालबा न आल्याने) वेळ भरपूर होता पण माणसे मर्यादा 'राखून' बोलली! क्रॉस पाटीपर्यंत जाऊन माणसे परतत होती. आपल्या भूमिकांचे व्यवधान (काहीचे) सुटले आणि मग तो 'एरव्ही'चा टोले—प्रतिटोल्यांचाच परिसंवाद झाला असे वाटू लागले. बरेचसे 'मुद्दे' हे 'गुद्दे' हाणण्यासाठी आणले गेले. व्यापक (विषयाची) बैठक उरली नाही. बरेचसे 'वृत्तपत्रीय' पद्धतीचे ऐकायला मिळाले. मग अखेर झाले काय? गंमत आली. मोठी मंडळी एकत्र पहायला व ऐकायला मिळाली. मला काही मंडळींचे काही विचार मात्र विचारार्ह वाटले. त्यातले काही तुमच्या विचारासाठी (विचार कराच असा आग्रह नाही. नाटकं मात्र अवश्य पहा—)

**ज्ञानेश्वर नाडकर्णी** यानी आपल्याकडे पाश्चात्य नाट्यक्षेत्रात Out dated झालेले नाटककार परिचित करून देण्याचे काम नाट्य-मन्वंतर व नंतरच्या मंडळीनी केले. अजूनही मिलर, टेनेसी वुइल्यम्ससारखे आजचे नाटककार परिचित करून दिले गेलेले नाहीत. त्यामुळे अजूनही मराठी प्रेक्षक नाट्य सुजाण झाला नाही. समीक्षा केवळ 'वृत्तपत्रीय' राहिली. तंत्रविषयक विचार आपल्याकडे फार होतो आहे. नाट्य हे कृत्रिम, लुटुपुटूचे आहे हा विचार मांडला गेला पाहिजे. नाटक हे मुळातच खोटे आहे. त्याचे खऱ्याशी संबंध जोडून चर्चा करणे मुळातच चुकीचे आहे. 'बेकेट'बद्दल म्हणताना तो नाटककार म्हणतो—'रंगभूमीच्या चौकटीतलेच सत्य मी मानतो. रंगभूमीपुरते तेवढेच सत्य ही भूमिका घेतली पाहिजे.'

**आत्माराम भेंडे** म्हणाले नाटक ही एक Co-operative कला आहे. ह्या सर्व अंगांचा सुजाण असलेले समीक्षक मिळत नाहीत. नाटकात Presentation चा भाग सर्वात महत्वाचा! 'प्रयोगा'शिवाय नाटकाचे मूल्य ठरत नाही. स्टॅनिस्लाव्हस्की म्हणतो 'नाटकात चांगले काय काय आहे ते समीक्षकाने प्रथम शोधून काढले पाहिजे.'

**प्रा. वसंत कानेटकर.**

"आजचं मराठी नाटक कदाचित् धंदा म्हणून बहरलं. मोहरलं

असेल, पण धंदा म्हणून ते विकसित झालं आहे. कला म्हणून नाही. माझ्या मते मराठी नाटक अजून धंद्यातून बाहेर आलंच नाही. कला म्हणून विचार व्हावा. प्रयोग व प्रयत्न व्हावेत. पण 'प्रेक्षक' हा महत्वाचा घटक नाटकात असतोच असतो हे नवनाट्याने (ही) विसरू नये"

**पु. भा. भावे.** "माणूस स्वतःची छबी आरशात पुन्हा पाहतो. ती त्याला पहावीशी वाटते. फोटो पाहतो. ते अगदी आपल्या-सारखे नसावेसे त्याला वाटते. हुबेहूब नसावे. ओळख पटावेसे मात्र असावे असे त्याला वाटते. वास्तव नसावेसे वाटते. नाटकातल्या वास्तवतेला त्यामुळेच मर्यादा पडतात. त्या समजून घेतल्या पाहिजेत. नाट्यविषयक क्रांतीला मर्यादा असतात. एक स्वप्न निर्माण करणे. एक Illusion निर्माण करणे हे नाटककाराचे काम. ते जग श्रेष्ठ आनंद देऊन जाते. नाटकातली भाषा संपूर्ण वास्तव नसते—नसावी. संदर्भाने भाषेचे स्वरूप ठरवले गेले पाहिजे.

संयोजक **गंगाधर गाडगीळ.** "खालच्या स्तरावरच्या नाटकांबद्दल वाईट बोलण्याचे कारण नाही. हिणकस नाटकांची नेहमीच चलती रहात आली आहे. मी काही नेहमीच कलावंत नसतो. कधी मला Escape ही हवा असतो. अशावेळी मी फार्स वा रद्दी सिनेमाही पाहतो. बरे वाटते. ती गरज असते. नाटकाला अनेक मर्यादा पडतात. ते त्या कलावंताचे रहात नाही. म्हणून उणा कलाप्रकार मला वाटतो. कलेच्या क्षेत्रात 'डायलॉग'ला महत्व आहे. आज नवनवीन प्रयत्न व प्रयोग होत असताना हा 'डायलॉग' होत नाही ही खरी तक्रार आहे. खंत आहे. तो झाला पाहिजे. नव्या नाटकाबरोबरच नवी नाट्य समीक्षा येईल. ती निर्माण कर-ण्याचे कार्य नव्या लेखक—दिग्दर्शकांचे आहे.

'विद्याझंकार'ने काढलेली पत्रिका मात्र अप्रतिम होती. कार्यक्रम तसा चांगला झाला. पण 'अनेकांगी डायलॉग' व्हायला हवा होता असे मात्र वाटते. रागावू नका मंडळी, आदतसे लाचार हूँ!!

# प्रेक्षक-परीक्षक—द्वंद्व समास

**नवी** नाटके, व्यावसायिक रंगभूमीवरची नवी नाटके, प्रयोग ह्या नावाने होणारे नवनाट्य—न—नाट्यादि प्रयोग, सरकारी नाट्य महोत्सव या नावाने होणाऱ्या प्रादेशिक नाट्यस्पर्धा, त्यांच्या-तली अंतिम फेरी, लोकनाट्य ह्या सोवळ्या नावाने होणारे तमाशे आणि वग, 'आंधळ दळतय्' सारखी रूपके, महिलामंडळे, वाचनालये, साहित्यसभा वगैरेच्या मदतीसाठी होणारे नाट्योत्सव वगैरे वगैरेमुळे नाटकांची सध्या भलतीच चलती आहे. स्पर्धेच्या निमित्ताने काही नवी नाटके रंगमंचापर्यंत पोहचली (काही तिथेच गारही झाली असे कळते) ती थोडक्यात (व बरीचशी फुकटात) पहायला मिळाल्याने बरीच 'जन्ता' खूष आहे असे कळते. नाट्यस्पर्धा ठिकठिकाणी होत्या. त्यामुळे सगळीकडे नाटक कळणारे. नाटक समजणारे—नाटकात काही रस असणारे 'तज्ज्ञ' (मोठ्ठाच संशोधनाचा विषय) परीक्षक सर्वत्र मिळणे एकूण कठिणच काम नाही का? त्यातल्या त्यात मग 'सोयी' 'नाती गोती' बरेवाईट पूर्वग्रह—ग्रह आणि परीक्षकांचा नसलेला तोल (सम) ह्यामुळे मग ह्या स्पर्धांच्या बाबतीत नेमके अनेकांचे (अनेक बाब-तीत) अपेक्षाभंग पदरात येतात. परीक्षकांची निवड करतांना, त्यांची त्या त्या केंद्रावर नेमणूक करताना, इतर परीक्षकांशी त्यांची सांगड घालतांना नेमके काय काय बघितले जाते? सर्व. साधारणपणे असा नियम असतो (असे आपण मानतो) की, ज्या संस्था (वा तिच्या संलग्न संस्था) असल्या स्पर्धांतून भाग घेतात, त्यांच्या पदाधिकाऱ्यांपैकी कुणी परीक्षक मंडळात सहसा असू नये. अन्याय होण्याची शक्यता तिथे गृहित धरावी लागते. काही ठिकाणी वृत्तपत्रातून नाट्यविषयक सदरे लिहिणारे नाट्य समीक्षक तर कुठे एखादा (कवि) प्राध्यापक परीक्षक म्हणून नेमला जातो. आता कवि वा कवितेचे आणि प्राध्यापकीचे व नाटकाचे वाकडेच असते वा असावे असे मी मानीत नाही. परंतु शासकीय नाट्य-स्पर्धेतल्या काही परीक्षकांची नांवे पाहिल्यावर हा अगदीच 'पोरा पोरी' खेळ होऊ नये असे सुचवावेसे वाटते. ज्यांचे दोन चार प्रयोगही होत नाहीत अशा नाटकाना 'युगप्रवर्तना'ची सवंग प्रशस्तीपत्रे बहाल करणाऱ्या आणि स्वतःच्याच 'पडेल' नाटकांवर 'महान' म्हणून शेरे मारणाऱ्या (आणि तरीही नेटका प्रपंच न जमणाऱ्या) परीक्षकांची तिथे गर्दी होऊ नये. प्रेक्षक, नाट्य-तज्ञ, कला रसिकांचा आणि परीक्षकांचा कौल यात जी मोठी तफावत दिसते ती त्यामुळेच! ह्यात व्यक्तिशः कुणाचा हेतुतः अधिक्षेप नाही बरं का! परवा स्पर्धांचे निकाल जाहीर झाले ना त्यावरून हे सुचलं! आता सगळीकडेच 'इंटरेस्टेड पार्टीज्' असतात हे खरं. पण चांगल्याला चांगलं म्हणायला काय हरकत आहे? परवाच्या स्पर्धेत गोवा हिंदु असोसिएशनने **आर्य चाणक्य** हे नवे नाटक, अगदी नवी माणसे घेऊन सादर केलं. नाटकाविषयी थोडेफार मतभेद असतीलही! पण '**आर्य चाणक्य**' ह्या नाटकाचा प्रयोग रंगभवन केंद्रावर झालेल्या सर्व नाटकात उजवा होता असं "लोकमत" होतं व आहेही. सारी नवी टीम असूनही प्रयोग दृष्ट लागण्याइतका चांगला झाला. गौरी (सुधा भांडारे) चाणक्य (नाथ दिवाण) राक्षसगुप्त (व्यंकटेश अण्णेगिरी) मलयकेतु (नारा-यण दांडे) चंद्रगुप्त (सदा सावर्डेकर) ही त्यातली काही प्रमुख पात्रे. गौरीचे काम करणारी सुधा भांडारे ही उद्याची एक श्रेष्ठ अभिनेत्री आहे ह्याचा प्रत्यय ते नाटक देऊन जाते. नेपथ्य, दिग्द-र्शन, संघभावना, पाठांतर, प्रयोगातले बारकावे ह्या सर्व दृष्टीनी प्रयोग नव्यांचा व नवशिका वाटत नाही. राक्षसगुप्त व चाणक्य ही जुगलबंदी (शेवटची) ही तर त्या दोघांच्या गुणांची कसोटी. छेः! पण त्या प्रयोगाला पहिले पारितोषिक मिळणार असे बोलले जात असूनही.....

पण माशी शिंकली! कशी, कुठे, कोणती ते एक रामच् जाणे! अलिकडे सरकार दरबारी 'माशा' फार झाल्या आहेत. त्या मार्च महिन्यापर्यंत सारख्या शिंकतच असतात म्हणे. आठ महिने त्या तपकीरीचे बार भरतात की सारखे आइस्क्रीम (अर्थातच दुसऱ्यांच्या पैशाने) खात असतात—न कळे! पण 'शिंकणे' हे मात्र सारखे चालू असते. साहित्यिक मंडळीना बक्षिसे दिली की, माशा एकदम 'पेटीबंद'! '**आर्य चाणक्य**' नाटकात आजच्या 'राज-कारणी' मंडळीना शिकण्यासारखे खूप खूप आहे. राक्षसगुप्त हाच चंद्रगुप्ताचा अमात्य झाला पाहिजे हे विचित्र (वाटणारे) स्वप्न उरी बाळगणारा चाणक्य आजच्या राजकारणात एक वेडा ठर-णार हेही खरं म्हणा. गोवा हिंदु असोसिएशनने नाटकांच्या इतिहासात एक नवा विक्रम प्रस्थापित केला आहे खास! रायगड, मत्स्यगंधा, लेकुरे उदंड जाली आणि आता चाणक्य! चारही भिन्न प्रकृतीची पण यशस्वी नाटके! चाणक्यच्या 'नव्या' टीमलाही व्यावहारिक यश मिळणार असे वाटते.

—भन्याबापू

## ब्रेव्हो बलबीर ! ब्रेव्हो लक्ष्मण ! !

**प्रत्येक** भारतीयाची मान अभिमानाने ताठ व्हावी असा पराक्रम नुकताच बँकॉक येथे घडला. शंकर लक्ष्मणच्या नेतृत्वाखाली भारतीय हॉकी संघाने आशियाई क्रीडा स्पर्धेतील हॉकीचे अजिक्यपद संपादन केले. आणि भारतीयांच्या कित्येक वर्षांच्या स्वप्नाची सांगता झाली. ऑलिम्पिक सामन्यात भारताने विजय मिळविला होता तरी तो विजय संपूर्ण झाला नव्हता. कारण १९५८ साली टोकियो येथे व १९६२ साली जाकार्ता येथे पाकिस्तानने भारताचा पराभव करून भारताचे श्रेष्ठत्व निरपवाद नाही हे जगाला दाखवून दिले होते. त्यामुळे बँकॉकच्या सामन्याकडे अवघ्या भारताचे कान आणि मन लक्ष देऊन होते. त्या सामन्याची 'कॉमेंटरी' ऐकण्यासाठी व ऐकत असता बेहोष होण्यासाठी जमलेली माणसे जणु त्या क्रीडामैदानावरच होती. क्षणाक्षणाला त्यांचे चेहरे बदलत होते. पण उरात कांक्षा होती लढा जिंकण्याची! ती जखमी 'बलबीर'च्याही उरांत संचारली आणि अत्यंत कौशल्याने त्याने 'विजयी' गोल चढविला. 'बलबीर हा वीर ठरला. हॉकी-स्टिक घेऊन लाखो भारतीयांच्या स्वप्नावर तो स्वार झाला. 'वीर' ठरला. जी लढत झाली ती फार उत्कट होती. कठिण होती. म्हणून विजयाचे मोलही मोठे! ह्या सामन्याने पराभवाचा कलंक धुवून निघाला. व 'हॉकी' ह्या खेळातले भारतीय श्रेष्ठत्व निरपवाद झाले. भारत-पाक हॉकी सामना हा नेहमीच अटीतटीचा असे. वातावरण तंग असे. तसेच ते त्या दिवशीही होते. 'पेनल्टी कॉर्नर'च्या नव्या नियमांमुळे खेळावर काही बंधने पडली होती. पण भारतीय खेळाडूनी नवे व आक्रमक पवित्रे घेतले व खेळाचे रंग-रूप बदलून टाकले. एक 'नवा खेळ' त्यानी जगाला दाखविला. ठरलेल्या वेळात कुणाच गोल न करता आल्याने जादा वेळ दिला गेला व त्यात 'बलबीर'ने तेज प्रगटविले, गोल केला.

क्रीडेच्या क्षेत्रात भारताची शान वाढविणारे अनेक विक्रम सध्या होत आहेत. रामनाथन कृष्णन् ह्याच्या 'अंतिम' यशाकडे आता साऱ्यांचे लक्ष लागले आहे. हॉकीप्रमाणेच टेनिसमध्येही आपण 'अजय' आहोत हे सिद्ध व्हावे अशीच आमची इच्छा आहे. आपणा साऱ्यांचीच ती असणार. हॉकीचे अजिंक्यपद ही एक वार्ता नाही. तो एक 'अनुभव' आहे. फार मोठा. फार उत्कट. बेहोष करणारा. आनंदाने नाचायला लावणारा. तशी माणसे—अगदी मोठमोठी—मेन ऑफ पोझिशन—टाय बूटवाली माणसे त्या दिवशी नाचली. 'हॉकी' हा भारताचा आणि भारताचाच खेळ हे त्या दिवशी पुन्हा एकदा निरपवादपणे सिद्ध झाले. आणि साऱ्यांच्या तोंडून निरपवादपणे एक उद्गार निघाला, ब्रेव्हो बलबीर! ब्रेव्हो लक्ष्मण! !

—सारस्वत

## अभिनंदन ! पुन्हा अभिनंदन !! त्रिवार अभिनंदन !!!

# हे निवडून आले आहेत

प्रिय वाचक,

१९६६ च्या दिवाळी अंकात 'हे उभे आहेत' ह्या शीर्षकाखाली आपला कौल मागणारे एक कूपन देण्यात आले होते. त्यात मला आवडलेली कथा। लेख। कविता। रंगीत कलाकृति। व्यंगचित्र वगैरेबाबतची आपली प्रतिक्रिया जाणून घेण्याचा हेतु होता. त्या योजनेला आपण जो सक्रिय पाठिंबा दिलात त्याबद्दल आम्ही प्रथमतः त्या स्पर्धेत भाग घेणाऱ्या वाचकांचे आभार मानतो. तसेच ह्या स्पर्धेत जे वाचक यशस्वीपणे भाग घेऊ शकले त्या यशस्वी स्पर्धक वाचकांचे आम्ही अभिनंदन करतो. अखेर आपला निर्णय हा 'आरसा' आहे असे आम्ही म्हटले होते. चोखंदळपणे अंक वाचून आपण दिलेला निर्णय आम्ही खाली देत आहोत. स्पर्धेबाबतचे नियम पूर्वी प्रसिद्ध केले आहेतच.

### हे निवडून आले आहेत

(१) सर्वोत्तम कथा .............. स्पर्श..............पु. भा. भावे......... १९६ मते

(२) सर्वोत्तम लेख .............. हास्य परमिट.......रमेश मंत्री......... ८४ मते

(३) सर्वोत्तम कविता ............ वाद्ळवेडी..........कुसुमाग्रज........... ७६ मते

(४) सर्वोत्तम रंगीत कलाकृति ........ विरहिनी.........दीनानाथ दलाल...... १३० मते

(५) सर्वोत्तम व्यंगचित्र ............ वस्त्रहरण........दीनानाथ दलाल...... ६० मते

### विनचूक विजेते

१) श्री. पी. एन्. भागवत, मुंबई ४.  २) श्री. चंद्रकांत पां. मोरे, मुंबई ११.

### एक चूक विजेते

१) श्री. अण्णाराव गोविंदराव डोईजोडे, सोलापूर–१.  २) श्री. शांताराम वि. पुरोहित, कऱ्हाड.
३) श्री. ना. रा. दप्तरदार, घाटकोपर.

### दोन चुका विजेते

१) श्री. नीळकंठ रा. शेंडे, वर्धा. २) श्री. प्र. गो. लोंदे, अमरावती. ३) सौ. राधिका उपेंद्र नाईक, गोवा. ४) श्री. कमलाकर ल. परांजपे, बिहार. ५) श्री. चंद्रकांत आ. प्रभु, वरळी. ६) श्री. नारायण तु. गुंडे, राजस्थान. ७) श्री. बी. एन्. बनसोड, अमरावती. ८) श्री. प्रभाकर जोगदंड, कल्याण. ९) श्री. यशवंत रा. चव्हाण, मुंबई–१०. १०) श्री. अरुण भालचंद्र फडके, कुर्ला. ११) श्री. अरुण ना. देशमुख, पुणे–२. १२) श्री. सुभाष गो. भूमकर, उस्मानाबाद. १३) श्री. सुरेंद्र भोसले, मुंबई–१३. १४) कु. प्रभा पां. दाते, मुंबई–२८. १५) श्री. सोपान हाळमकर, बडोदे. १६) श्री. विवेकानंद कसबेकर, बेळगांव. १७) श्री. वामन रा. वेंगुर्लेकर, मुंबई–४. १८) श्री. सुधाकर ता. आघाम, यवतमाळ १९) श्री. काशीनाथ कुमठेकर, हैद्राबाद. २०) श्री. सु. दि. तांबोळी, नाशिक. २१) श्री. नागराज वि. अय्यर, मुंबई २२. २२) श्री. बाळकृष्ण द. माळवदे, कोल्हापूर. २३) सौ. सीमा पां. खाला-पूरकर, मुंबई ८. २४) श्री. पां. स. खालापूरकर, मुंबई ८. २५) श्री. विजय दा. सावंत, महाड.

**'हे उभे आहेत'** ह्या स्पर्धेत एकूण ३७९ वाचकानी भाग घेतला. पुष्कळानी आपली मते पत्रातच लिहून पाठविली, त्यांचा संपादन करून **'स. न. वि. वि.'** ह्या सदरासाठी उपयोग करण्यात आला. **कुपन्सचाच फक्त सदर स्पर्धेत विचार करण्यात आला आहे.** यशस्वी लेखकांचे, स्पर्धकांचे आम्ही प्रकट अभिनन्दन करतो.

**टीप** :—ज्या स्पर्धकाना आपले कूपन विनचूक आहे असे खात्रीपूर्वक वाटत असेल त्यानी १० जानेवारी, १९६७ पर्यंत पत्राद्वारे कळवावे. नंतर आलेल्या तक्रारींचा विचार केला जाणार नाही. विजयी स्पर्धकाना बक्षीसाची रक्कम २० जानेवारी १९६७ पर्यंत रवाना केली जाईल. तिसऱ्या बक्षिसाच्या २५ मानकऱ्याना रोख रक्कम न पाठवता दीपावलीचे जानेवारी व फेब्रुवारी असे दोन अंक पाठविण्यात येतील. यासंबंधी कोणताहि पत्रव्यवहार करू नये.

**–व्यवस्थापक**

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment JANUARY 196
DIPAVALI MONTHLY




COVER PRINTED AT ASHA PRINTERY, BOMBAY-4